या पुस्तकांतील लेख ' बायकांच्या दृष्टिकोनांतून नवरे ' या नावांखालीं "हंस" मासिकांत ऑगस्ट १९४७ ते एप्रिल १९४८ या कालावधींत प्रसिद्ध झाले होते.

# रमा–माधव

थोर पुरुषाच्या पत्नीपदाचा लाभ एखाद्या स्त्रीला होणे ही गोष्ट तिच्या परम भाग्याची समजतात. नवऱ्याच्या मोठेपणात, विवाहप्राप्त हक्काने, स्त्रीला प्राप्तीचा अर्धा वांटा मिळतो हें खरें आहे. एखादी स्त्री केवळ एखाद्या थोर पुरुषाची पत्नी असल्यामुळेंच तिचें नांव सर्वश्रुत होतें. त्यासाठी तिच्या ठिकाणी काहीं विशिष्ट गुण किंवा वेगळे कर्तृत्व असावेच लागतें, असे नाही. वकिलाची बायको निरक्षर असली तरीही ज्याप्रमाणें वकिलीणबाई म्हणून ओळखली जाते, त्याचप्रमाणे थोर पुरुषाची स्त्री स्वत: काहीही न करतादेखील, थोर स्त्री म्हणून सर्वांच्या आदरास पात्र ठरते !

हा झाला लौकिक व्यवहार. पण या सर्व व्यवहारात त्या स्त्रीच्या मनो भूमिकेचा विचार कोणी करतो का ? थोर पुरुषाची पत्नी कांहींही न करता समाजांत मान्यता मिळवूं शकते हे खरे आहे; पण संसारात ती इतर चार-चौघींप्रमाणें सुखी व समाधानी असते का ? ज्याला सारा समाज थोर पुरुष म्हणून डोक्यावर घेऊन नाचतो, त्या तिच्या नवऱ्याविषयी खुद्द तिला

काय वाटते याचा कधी कुणी कानोसा घेतला आहे काय? थोर पुरुषाच्या पदरी पडल्यामुळेच अनेक स्त्रियाना स्वतःचे मन मारून जीवन जगावे लागत आहे. अर्थातच आपल्या स्त्रियाच्या अंगी असलेले 'आर्य' रक्त त्याच्या तोंडून या प्रकाराविरुद्ध ब्रही काढू देत नाही. पण समजा की, सर्व थोर पुरुषाच्या बायकानी आपापल्या 'थोर' नवऱ्याच्या सहवासात आपल्या वाट्याला आलेल्या सुखदु:खाचा भोगवटा स्पष्टपणे व मोकळेपणे सागून टाकण्याचे मनात आणले, तर अनेक थोर पुरुषाच्या "मोठेपणा"त काही टक्के तरी कपात करूनच त्याचा मोठेपणा मोजीत बसण्याची पाळी समाजावर खास येईल!

नवऱ्याविषयी मोकळेपणाने व स्पष्टपणाने आपले अनुभव लिहिणे ही गोष्ट अजूनहि निदान महाराष्ट्रीय महिलात तरी विरळा आढळते. या दृष्टीने जुन्या काळच्या अडाणी बायका आणि नव्या काळातील सुशिक्षित स्त्रिया याच्यात फारच थोडी तफावत आहे. नवऱ्यासंबंधी काही लिहिणाऱ्या बायकाहि स्त्रीशिक्षण सुरू झाल्यापासून इतक्या वर्षात हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याहि निघालेल्या नाहीत. रमाबाई रानडे यानी "आमच्या आयुष्यातील काही आठवणी" हे पुस्तक लिहून महाराष्ट्रीय महिलाना एक नवा धडा घालून दिला, त्याला आता तीन तपाहून अधिक काळ लोटला आहे. पण एवढ्या दीर्घ अवधीत, स्त्रीशिक्षणाचा सर्रास प्रसार होऊनहि, आपापले संसारातील अनुभव सत्य व स्पष्टपणे लिहिणाऱ्या बायका अपवादभूतच आहेत.

रमाबाई रानडे ह्या तसे पाहिले तर शिकल्या सवरलेल्या नव्हत. त्याचे जे काहीं शिक्षण झाले ते घराच्या चार भितीत, नवऱ्याजवळ. एकदोन वेळा त्याच्या शिक्षणासाठी बाहेरील एकदोन शिक्षकिणीची योजना न्या. रानड्यानीं केली होती, पण तीही अल्पकालीनच ठरली. रमाबाई जे काहीं शिकल्या-सवरल्या, ते सर्व रानड्याच्या सहवासाचे फळ. त्यानी रानड्याच्या मृत्यूनंतर "जो श्रेष्ठात्मक सहवास आता राहिला नाही त्याचा मानसिक रीतीने अनुभव घेण्यासाठी, वेळोवेळी घडलेल्या गोष्टी व झालेली संभाषणे काही

सहज, काही विशेष कारणामुळे ध्यानात राहिलीं ती तशीं सध्याचे स्थितीत अंतःकरणाचें सांत्वन करण्यासाठी हा आठवणींचा ग्रंथ तयार केला." पुस्तकाचा हेतु "सार्वजनिक गोष्टीचा उल्लेख करण्याचा नसून रावसाहेबांच्या (रानड्यांच्या) एकंदर आयुष्यक्रमाचे चित्र महाराष्ट्रीयांपुढे नीटपणे ठेवण्या-साठीं त्यांना (रमाबाईंना) स्वतःस असलेली व त्यांनी इतरांपासून मिळविलेली खाजगी माहिती प्रसिद्ध करण्याचा आहे."

"आमच्या आयुष्यातील काही आठवणी" या पुस्तकाचे वैशिष्ट्य या त्याच्या हेतूंत आहे. न्या. रानडे यांचे सार्वजनिक कार्य एवढें विशाल होते की, त्याच्या कुठल्याहि एका विभागाच्या वर्णनासदेखील "आठवणी" एवढा ग्रंथ अपुराच पडला असता. रमाबाई त्या भानगडीतच पडल्या नाहीत. न्या. रानडे महाराष्ट्राच्या दृष्टीने केवढेही महान् पुरुष असले, तरी रमाबाईंच्या दृष्टीने ते त्यांचे पतिदेव होते व त्याच दृष्टीने त्यांनीं 'आठवणी'मध्यें रानड्यांचे चित्र रंगविले आहे. 'आठवणी'मध्ये न्या. रानड्यांचे जें दर्शन होते, तें 'महाराष्ट्राच्या थंडगार बर्फासमान गोळ्यांत नवचेतना निर्माण कर-णाऱ्या राष्ट्रपुरुषाचें' नसून रमाबाईंच्या नवऱ्याचें आहे.

न्या. रानडे हे राष्ट्रपुरुष म्हणून कसे होते ह्या गोष्टीपेक्षाहि एका स्त्रीचा नवरा या नात्याने ते कसे होते याचेच चित्र रमाबाईंच्या 'आठवणींत' दिसतें. सार्वजनिक पुढारी हे नेहमीच संसारी गृहस्थ म्हणूनहि चांगले असतातच असें नाही. सार्वजनिक कार्यकर्ता किंवा साहित्यिक म्हणून ख्यातनाम झालेल्या व्यक्तींच्या बायका जर रमाबाई रानड्यांचा कित्ता गिरवून आपापल्या आयुष्यांतील आठवणी लिहूं लागल्या, तर अनेक 'थोर' पुरुषांच्या थोरवीला कंगोरे गेल्यावाचून राहणार नाहीत.

रमाबाईंनी "आमच्या आयुष्यातील आठवणी" लिहिताना जी भूमिका घेतली आहे, ती भक्ताने केलेल्या नामसंकीर्तनाची आहे. न्या. रानड्यांच्या ठिकाणी रमाबाईंची निःस्सीम भक्तिभावनाच या पुस्तकात पदोपदीं व्यक्त होते. रमाबाईंच्या वेळचा काळ व परिस्थिति, रमाबाईंच्या मनावर लहान-

पणापासून झालेले विशिष्ट संस्कार, रमाबाईंच्या लग्नाच्या वेळीं त्यांच्या आणि माधवराव रानडयांच्या वयांत असलेलें एकवीस वर्षांचें अंतर रमाबाईना रानडयांनीं आमरण ज्या तऱ्हेने वागवलें ती वात्सल्यपूर्ण तऱ्हा वगैरे गोष्टी लक्षात घेतां रमाबाईंनीं माधवरावाविषयी मनात अनन्य-साधारण भक्तिभाव बाळगावा यात काहीं नवल वाटत नाही. रमाबाई ज्या काळात तेव्हा वावरत होत्या, त्या काळच्या घरंदाज कुलीन स्त्रियाची सर्वसाधारण रीतच पतीला—मग तो कसाहि असो—देव मानण्याची व त्याच्या सेवेत आयुष्य वेचण्याची होती. सुदैवाने रमाबाईना लाभलेला नवरा या भक्ति भावाला पात्र होता, हा भाग वेगळा.

" आमच्या आयुष्यातील आठवणी " हे मराठी वाङ्मयातील पहिलेच पुस्तक असे आहे की ज्यात पत्नीनें पतिविषयक आपल्या भावना, अनुभव व विचार खुल्या मनाने सांगितले आहेत. या पुस्तकाच्या प्रकाशनानंतर गेल्या तीन तपात अशा तऱ्हेचा प्रयत्न आणखी काहीं स्त्रियानी केला आहे. त्याची संख्या मोजकी असली, तरी त्यानीं आपापल्या पतीविषयीं ज्या पद्धतीनें विवरण केलें आहे, त्याचे सूक्ष्म दृष्टीने परीक्षण केल्यास, गेल्या छत्तीस वर्षांत स्वतःच्या पतीविषयीं जास्त जास्त मोकळेपणानें व निर्भयतेने लिहिण्याइतकें मनोधैर्य महाराष्ट्रीय महिलाच्या ठिकाणीं हलके हलके येत चाललें असल्याचें दिसून येईल.

बायकांच्या दृष्टिकोनातून निघणारीं नवऱ्याचीं हीं शब्दचित्रे खरोखरीच मोठीं मनोरंजक आणि उद्बोधकहि आहेत. रमाबाई रानडयानी प्रथम या दृष्टाने सुरुवात केली. रमाबाईंनीं आपल्या आठवणी लिहितांना माधवराव देव व आपण स्वतः भक्त ही भूमिका घेतल्यामुळें या पुस्तकांत रानडयांच्या चित्रात गुणवत्तेचा रंगच सर्वत्र ठसठशीत प्रमाणात दिसतो हे साहजिक आहे. प्रथम-पत्नी वारल्यावर स्वतःच्या मताप्रमाणें पुनर्विवाह न करता स्वतःहून एकवीस वर्षें लहान असलेल्या कुमारिकेबरोबर लग्न केल्याबद्दल, न्या. रानडयांना अनेकांनी ठपका दिला आहे; पण या गोष्टीबद्दल रमाबाईंनीं आपला अभिप्राय असा नमूद केला आहे कीं,—

" मला तर उलट असे वाटते, कीं सर्व चरित्रामध्यें खऱ्या स्वार्थ-त्यागाचा व मनाच्या मोठेपणाचा जो कांहीं भाग असेल त्यामध्ये अत्यंत उदात्त व महत्त्वाचा भाग हाच आहे. यासंबधाने कोणी कितीही आपापल्या दृष्टीप्रमाणे नांवे ठेवलीं तरी मला तर याबद्दल अत्यंत आदर वाटतो व खऱ्या भक्तीने एकंदर चरित्राकडे अवलोकन करणारापैकीं कोणासहि असेंच वाटेल."

या उताऱ्यातील ' खऱ्या भक्तीनें ' हे शब्द फार महत्त्वाचे वाटतात. कारण रमाबाईनीं रानडयाच्या सबंध आयुष्याकडे अशाच ' खऱ्या भक्तीनें ' पाहिलें असल्याची साक्ष या ' आठवणी ' देतात.

" संसारात बायकोचा संबंध अगदी सावलीसारखा असतो " असें आपल्या पुस्तकात एके ठिकाणीं रमाबाईनीं म्हटलें आहे व रमाबाईचें पुस्तक वाचून झाल्यावर रमाबाई माधवरावाची सत्तावीस वर्षे ' सावली ' बनून कशा राहिल्या होत्या याचेंच चित्र मनावर उमटतें. तासगांवच्या मुलींच्या शाळेचा बक्षिससमारंभ होऊन रमाबाईच्या हस्तें बक्षिसें वांटण्यांत आलीं तेव्हां मुलींना उद्देशून केलेल्या भाषणात रमाबाईनीं सांगितलें कीं,

" विद्या, संपत्ति, अधिकार, यांसारखे कोणतेंहि वैभव प्राप्त झालें असतां आपण अधिक नम्र व विनयशील होऊन आपल्या पतीशीं व वडील माणसांशीं आदरानें व आज्ञाधारकपणानें वागावें यांत आपलें कल्याण आहे. "

पतीशी आदरानें व आज्ञाधारकपणाने वागण्यांतच आपलें कल्याण आहे ही रमाबाईची आंतरिक श्रद्धा दिसते; ती केवळ व्याख्यानांतील टाळीची वाक्ये नव्हतीं. कारण:

" **स्वतः**ला ( रानडयांना ) ज्या गोष्टी पसंत असत, त्या गोष्टी कांहीं झालें तरी केल्या पाहिजेत; नाहीं तर राग येईल, हें मला (रमाबाईंना ) पक्के माहित असल्यामुळे **स्वतः**ला हवी असेल तीच गोष्ट करण्यास मी

कधीं चुकत नसे. एक जें माझे खऱ्या सुखाचें व समाधानाचें ठिकाण त्यांत अंतर येत नसे व ही एक समाधानाची बाजू बळकट असेल तर घरांतील इतर कोणत्याहि माणसांकडून होणारा जाच व त्रास सोसण्याला मात्र अधिक बळकटी येईल, अशी माझी पक्की समजूत होती. .... कोणालाच बरेंवाईट कांहीच न बोलतां मुकाट्यानें स्वतःच्याच आवडीच्या दिशेनें वर्तन ठेवण्याचा माझा सर्वस्वी कल असे.''

असे रमाबाईंनी एके ठिकाणी म्हटले आहे त्याची सत्यता या पुस्तकाचें पान न् पान पटवून देतें.

काहींहि झालें तरी रानड्यांना आवडत असत त्याच गोष्टी करण्याचा रमाबाईंनीं क्रम ठेवला होता. याचे कारण रानड्यांवर रमाबाईंची अतोनात भक्ति होती. त्यांनीच एके ठिकाणी म्हटले आहे:

"मला समजूं लागल्यापासून माझ्या सर्व सुखाचा व आनंदाचा ठेवा काय तें एवढंच ठिकाण ( रानडे ) आहे. संसारांत मला मुलेंबाळें नाहींत ही उणीवसुद्धां मला कधीं भासली नाहीं. इतकी मी याच सहवासांत संतुष्ट व गर्क आहे. राजेरजवाडे, संस्थानिक, जहागिरदार यांच्या बायका संततिसंपत्तीनें व अधिकारवैभवाने कितीहि थोर असल्या, तरी माझ्यापेक्षां त्यांचे सुख खास अधिक नसेल. स्वतःची ( रानड्यांची ) जोड मिळाल्यानें मला आज जी धन्यता व जे समाधान होत आहे तिला उपमा नाहीं."

न्या. रानड्यांशी आपला जुळून आलेला संबंध हा रमाबाईंना ईश्वरी प्रसाद वाटे. त्या म्हणतात,

"माझ्यामध्ये कुलीन घराण्याशिवाय स्वतःचा ( रानड्यांचा ) संबंध जुळण्यासारखें रूप, रंग, गुण किंवा विद्या यापैकीं कांहींच नसून केवळ परमेश्वराच्या कृपाप्रसादानें मला ही जन्माची जोड मिळून माझें जीवित धन्य झालें आहे."

रानडे हे रमाबाईना आपली एकमेव 'विसाव्याची जागा' वाटत. त्याच्या शब्दावर रमाबाईची श्रद्धा चटकन बसे. रानडयाच्या "त्या प्रेमपूर्वक व शांत शब्दाचा मनावर इतका परिणाम होई की, दिवसभर झालेला त्रास मी केव्हाच विसरून माझ्यासारखी सुखी कोणीच नाहीं, असे वाटून सकाळपर्यंत मी आनंदात असे." असे त्यानी एके ठिकाणी म्हटलें आहे. रानडयाच्या ठिकाणी काहीं दैवी सामर्थ्य आहे असेंहि रमाबाईना कधी कधी वाटत असे. रमाबाइंच्यावर एकदा शस्त्रक्रिया करून घेण्याचा प्रसग आला असता त्या वेळच्या आपल्या मनःस्थितीचे त्यानी केलेले वर्णन त्याचा रानडयाकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्पष्ट करते. ऑपरेशन–टेबलावर क्लोरोफॉर्म देण्याच्या वेळी त्यानी मनातल्या मनात प्रथम रानडयाना व नंतर देवाला नमस्कार केला. आपल्यावर ईश्वराची कृपा आहे म्हणूनच आपण रानडयाच्या पदरी पडलो असे रमाबाइंना वाटे व ह्या सहवासाचे सुख आणखी काही दिवस मिळावे हेच त्याना परम भाग्य वाटे. अर्थातच—

> "माझ्या हातून **स्वतः**ची सेवा घडली, व दुखण्याबहाण्याच्या वेळेस माझा **स्वतः**ला उपयोग झाला, तरच माझे जगण्याचे सार्थक आहे."

असे त्याना वाटावे यात नवल कोणते ?

"ज्या देदीप्यमान तेजोमय सौभाग्यसूर्याच्या प्रकाशात मी मोठ्या भूषणानें व खऱ्या आनंदाने एकसारखी २७ वर्षें वागत होते, ते प्रत्यक्ष सेवा घेणारे दिव्य सूर्यरूपी पाय मला अंतरल्यामुळे अत्यंत दुःखरूप निबिड अंधारात चांचपडत राहण्याचा प्रसंग पोहोचला" असे रमाबाईनी आपल्या-वरील दैवाघाताचे वर्णन केलें आहे. रानडयाकडे पाहण्याची रमाबाईची 'आठवणीत' दिसून येणारी दृष्टि व वृत्ति पाहता या आठवणीच्या संभारांत पूजाद्रव्यावाचून दुसरे काही सापडणे शक्य नाही अशी साहजिक कल्पना होते. रमाबाईनी रानडयांच्या कुठल्याहि सार्वजनिक कार्याची चर्चा किंवा साधा निर्देशहि करण्याचा पुस्तकात प्रयत्न केलेला नाही. या 'आठवणी'त

रानड्यांचें जें वर्णन आढळतें, तें रमाबाईंचे पति माधवराव यांचेंच सर्वस्वी आहे. रानड्यांच्या रमाबाईंशीं वागण्याच्या पद्धतीचा एक ठरींव नमुनाच या आठवणींतून दृष्टीस पडतो. " आपण न बोलतां, न सांगतां आपल्या माणसानें ( रमाबाईंनीं ) मात्र आपल्याच धोरणानें वागलें पाहिजे. अशी स्वतःच्या मनाची अट असे."

रानड्यांनीं एके प्रसंगीं रमाबाईंना बजावलें, " आपलें माणूस धोरणानें वागलें नाहीं तर तें कोणाला बरें आवडेल? एकदां आपल्या माणसाच्या आवडीची दिशा समजली म्हणजे तीच बळकट धरावी, म्हणजे दोघांनाहि त्रास होणार नाहीं."

रानडे रमाबाईंना कसे वागवीत याची कल्पना एकदोन आठवणींवरून करतां येते. सखू व नानू या दोन मुलांपैकीं सखूला बरोबर लाहोर-कॉंग्रेसला न्यावी व नानूला मुंबईस ठेवावें हें रमाबाईंना पटेना; तेव्हां रानड्यांनीं सांगितलें, " या पंचायतींत तूं पडूं नकोस. मी सांगतों तसें कर. जी गोष्ट करावयाचीच आहे तिची वाटाघाट करीत बसूं नये. सांगितलें तसें करावें." आणखीहि एका प्रसंगीं रमाबाईंनीं कांहीं शंका काढली असतां रानड्यांनीं त्यांना सांगितलें, " मी जें सांगेन तें मुकाट्यानें करावयाचें टाकून उलट कांहीं तरी विचारीत बसतां, याचा काय अर्थ ? "

आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी काळजीपूर्वक वाचल्या तर हें लक्षात येतें कीं, रमाबाईंची रानड्यांविषयींची भावना निरतिशय भक्तीची दिसते. रानड्यांची रमाबाईविषयींची भावना वात्सल्यपूर्ण सत्ताधिकाऱ्याची दिसते. रानड्यांनीं रमाबाईंना 'मी सांगतों तें मुकाट्यानें कर' असें हरेक प्रसंगीं म्हटलें आहे. रमाबाईंना कांहीं विचारस्वातंत्र्य रानड्यांनीं दिल्याचें एकहि उदाहरण सबंध पुस्तकांत सांपडत नाहीं याचें मात्र राहून-राहून आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाहीं. रमाबाईंची यासंबंधीं कसलीच तक्रार नाहीं आणि रानड्यांविषयींचा त्यांचा भक्तिभाव पाहतां असा कांहीं विचारहि त्यांच्या चित्ताला स्पर्श करणें शक्य दिसत नाहीं. पण त्यांनीं

अत्यंत भक्तिभावानें आपल्या पतीविषयीं जें लिहिलें आहे त्याची जर योग्य चिकित्सा केली, तर हा विचार मनांत येणें अपरिहार्य आहे. रानडयांनीं रमाबाईंना शिकविलें, पण त्यापायीं रमाबाईंना सोसाव्या लागलेल्या घरगुती छळाचा बंदोबस्त करण्याचा काडीमात्रहि प्रयत्न त्यांनीं केला नाहीं, रमाबाईंना शिक्षणविषयक सार्वजनिक कामांत यथाशक्ति भाग घेण्यास उत्तेजन दिलें, पण साध्यासुध्या गोष्टींतसुद्धा "मी सांगतों तें तूं मुकाटयानें कर" ही वृत्ति कधीं सोडली नाहीं. रानडे आणि रमाबाई यांच्या विद्वत्तेंत आणि वयांत असलेल्या अंतराचा तो अपरिहार्य परिणाम होता हें मान्य केलें, तरीहि भक्ताच्या निस्सीम भक्तीनें देव फारसा पाझरला नाहीं हा आक्षेप शिल्लक राहतोच.

संसारांत बायको ही नवऱ्याची केवळ सावली आहे असा उल्लेख रमाबाईनींच 'आठवणींत' एके प्रसंगीं केला आहे आणि सत्तावीस वर्षें त्यांनीं रानडयांची 'सावली' बनूनच आयुष्य काढण्यांत धन्यता मानली व मिरवली. रानडयांनीं मात्र आपल्या सावलीपेक्षा अधिक मोठी प्रतिष्ठा रमाबाईंना यावी असा प्रयत्न केल्याचें या पुस्तकावरून तरी दिसत नाहीं. आपण म्हणूं तें सर्व बायकोनें मुकाटयानें करावें, त्यांसंबंधीं कसलीहि शंका तोंडानें नुसती उच्चारूंहि नये असा रानडयांचा खाक्या दिसतो. स्वतःच्या पत्नीबाबतहि व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वाचा आदर ठेवण्याचें आगरकरी धोरण रानडयांना मान्य नव्हतें. प्रार्थनासमाजातील उपासनेला एरवीं रमाबाई गेल्या नाहींत तरी रानडयांची तक्रार नसे; पण त्याची स्वतःची ज्या दिवशीं उपासना असेल, त्या दिवशीं मात्र रमाबाई उपासनेला उपस्थित असल्या पाहिजेत व उपासनेची त्यांना समजहि पडली पाहिजे असा रानडयांचा कटाक्ष दिसतो. सर्वांत आश्चर्य वाटतें तें या गोष्टीनें कीं, रानडे एवढे विद्वान् व सुधारक असतांहि, तत्कालीन सनातनी स्त्रियांच्या पद्धतीप्रमाणें रानडयांच्या जेवलेल्या उष्टया ताटातच रमाबाई स्वतः जेवायला बसत, या घाणेरडया पद्धतीला रानडयांनीं मनाई केली नाहीं!

निरतिशय भक्तिभावानें रमाबाईनीं केलेल्या रानड्यांच्या नामसंकीर्तनांतहि चिकित्सक दृष्टीला असले कांहीं खेदकारक प्रसंग स्पष्ट दिसतात. स्वतःला नकळतच रमाबाईनीं माधवरावांच्या स्वभावातील या गोमा 'आठवणीं'त उघड केल्या आहेत. रमाबाईपेक्षा जास्त स्पष्टपणानें आणि स्वतःच्या अस्मितेची जाणीव ठेऊन स्वतःच्या पतीविषयी ज्या स्त्रियानीं लिहिले, त्या लिखाणांतून त्यांच्या पतिदेवाची वाङ्मयमूर्ति कसकशी निर्माण होते ते आपण क्रमशः पाहूंच. म्हणजे गेल्या तीन तपात बायकांचा नवऱ्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन कसा व किती बदलला आहे तेहा आपणास कळून येईल.

# आनंदी—गोपाळ

'आमच्या आयुष्यांतील काहीं आठवणी' या रमाबाई रानडयाच्या पुस्तकाच्या प्रकाशनानंतर डॉ. सौ. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र प्रसिद्ध झालें असलें, तरी रमाबाईंनीं आपल्या आठवणी कागदावर लिहून काढण्यास सुरुवातहि करण्यापूर्वी किती तरी वर्षें आनंदीबाई जोशी यांचा इहलोकचा चरित्रग्रंथ आटोपला होता! म्हणजे कालमानाने बोलायचें तर आनंदीबाईंनी आपल्या पत्रांतून आपल्या नवऱ्याचें जें शब्दचित्र चितारलें आहे, ते रमाबाईंनीं 'आठवणीं'तून रंगवलेल्या माधवरावांच्या चित्रापूर्वीचे आहे. मात्र तें चित्र खाजगी पत्र-व्यवहाराच्या स्वरूपाचें असल्यामुळे वाङ्मयाच्या वेशीवर तें रमाबाईंच्या 'आठवणीं'नंतर आलें!

एका दृष्टीने या पत्रव्यवहारांतून आनंदीबाईंच्या लेखणीनें काढलेले आपल्या पतीचें चित्र अपूर्ण आहे. कारण आनंदीबाईंच्या चरित्रांत आनंदीबाईंनीं गोपाळरावांना लिहिलेलीं पत्रे दिलीं आहेत, तशीं गोपाळरावांनीं

आनंदीबाईंना लिहिलेलीं पत्रें फार दिलेलीं नाहींत. त्यामुळें आनंदीबाईंनीं पत्रांत लिहिलेल्या मजकुराच्या संदर्भावरूनच गोपाळरावानीं आपल्या पत्रांत काय लिहिलें असावें याचा तर्क बसवावा लागतो. या खाजगी पत्र-व्यवहारानें ही जशी एक गैरसोय केली आहे, तद्वत् एक मोठी सोयहि केली आहे. ती ही कीं, हीं पत्रें केवळ नवराबायकोमधील खाजगी मामला असल्यानें त्यांत कमालीचा मोकळेपणा व घरगुतीपणा दिसून येतो. या कारणानेंच या पत्रव्यवहारांतून आनंदीबाई आणि गोपाळराव यांच्या स्वभा-वाच्या, वर्तनाच्या आणि परस्परांविषयींच्या भावनेच्या छटा सहजरम्य स्वरूपांत पाहावयास मिळतात. हीं पत्रे प्रसिद्धीसाठीं मुळींच लिहिलेलीं नाहींत. 'जें काय आपणांस वाटतें, ते मोकळेपणीं एकमेकांशीं बोलून अशाच तऱ्हेनें सत्य कोणतें तें ठरवून टाकूं,' या बुद्धीनेंच हीं पत्रें 'लिहिलीं आहेत. त्यांना सूर्यप्रकाश दिसावा अशी अंधुकहि अपेक्षा आनंदीबाईंच्या मनांत नव्हती. उलट, हीं पत्रें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा विचार एकदा गोपाळरावांनीं सुचवला असतां, 'आपलीं पत्रें एक वेळ जाळून टाका, पण तीं पुस्तकरूपांत छापून जगाचें हंसें ओढवून घेऊं नका,' असा निग्रहाचा जबाब आनंदीबाईंनी एका पत्रांत दिला आहे.

गोपाळराव कितीहि विक्षिप्त असले, तरी त्यांनीं आनंदीबाईचीं पत्रें न जाळतां जपून ठेवण्यांत महाराष्ट्रावर उपकारच केले, असें आतां म्हटलें पाहिजे. कारण आनंदीबाईची महान् योग्यता नीट समजण्यास त्यांचीं हीं पत्रें हें एक उत्कृष्ट साधन आज त्यामुळें उपलब्ध झालें आहे. आतां, या पत्रांतून खुद्द गोपाळरावांचें जें व्यक्तिदर्शन होते तें, गोपाळरावांच्या दृष्टीनें, फारसें सुखकारक नाहीं हें खरें; पण तो दोष आनंदीबाईच्या पत्रलेखनाचा नसून, खुद्द गोपाळरावांच्या स्वभावाचा आहे, त्याला कोण काय करणार ?

आनंदीबाईचा जीवनग्रंथ अवघा बावीस वर्षांचा आहे. एवढ्या अल्प वयांत अमेरिकेसारख्या दूरच्या देशांत एकटीनें जाऊन चार वर्षें विद्याभ्या-सांत काढणाऱ्या स्त्रीचें चरित्र हें एखाद्या अद्‌भुत कादंबरीसारखें वाटतें.

पण आनंदीबाईंच्या मोठेपणाचें वर्णन करीत बसण्याचा माझा येथें हेतु नसल्यानें त्यांच्या चरित्रांतील एका विवक्षित गोष्टीपुरतेंच माझें विवेचन मर्यादित ठेवणें भाग आहे. आनंदीबाईंचे पति गोपाळराव जोशी हे वास्तविक पाहतां आनंदीबाईंच्या मानानें अगदीं सामान्य गृहस्थ वाटतात. त्याच्या हातून जें कांहीं साहसकार्य झालें ते देखील त्यांच्या स्वभावांतील विक्षिप्तपणामुळेंच त्यांच्याकरवीं घडलें असें म्हणणें सत्याला अधिक धरून होईल! या स्वभावजन्य विक्षिप्तपणाचा आनंदीबाईंना फायदा झाला, तसाच त्यांना त्रासहि खूप सोसावा लागला. पण आनंदीबाईंच्या मनाचा मोठेपणा यांत दिसून येतो कीं, वेळप्रसंगीं नवऱ्याची स्पष्टास्पष्ट खरडपट्टी काढण्यास त्यांनीं कमी केलेलें नसलें, तरी गोपाळरावानी आपणासाठीं काय केले याची जाणीव त्याच्या ठिकाणी सदैव जागृत दिसते. आनंदीबाई गोपाळरावांना लिहिलेल्या एका पत्रांत म्हणतात,—

> "अभ्यास खेरीज करून एक आपल्या पत्रापासून मात्र मला आनंद व समाधान होतें. आपणास गोड लागावें म्हणून मीं आपल्या तोंडासमोर असें म्हणेन, असें मुळींच समजूं नका. कारण मी तसें करणारी नव्हे, हे आपणांस माहितच आहे. या जगांत आपली जागा कशानेंच भरली जाणार नाहीं. आपल्या शब्दसामर्थ्यानें आपण मजसाठीं काय काय केलें, हें मी जाणून व त्याविषयीं कृतज्ञ नाहीं काय? आपण माझे नेते, शास्ते, समाधानकर्ते व त्राते आहां. इतकेंच नव्हे, तर आपण मला गुलामगिरींतून मुक्त करून स्त्रियांच्या उत्तम पदवीप्रत नेऊन ठेवलें आहे व त्यामुळें मी सदोदित कृतज्ञ राहीन."

या पत्रांत आनंदीबाईंसाठीं गोपाळरावांनीं काय केलें तें समर्पकपणें मांडलेलें आहे. एरवीं कल्याण येथील एका साधारण इसमाची पुरी अक्षरओळखहि होण्यापूर्वी अकराव्या वर्षी विवाहित होऊन तेराव्या वर्षी

मातृपदाला पोंचलेली मुलगी बाविसाव्या वर्षी वारली तेव्हां एक "जागतिक व्यक्ति" ठरती ना! आनंदीबाईच्या हातून जे कांहीं झाले त्याच्या मागे गोपाळरावांचीच प्रेरणा सर्वस्वी होती हे विसरतां कामा नये. किंबहुना गोपाळरावांची पहिली बायको वारल्यानंतर आनंदीबाईशीं त्याचें लग्न झालें तेव्हा त्यानीं अटच घातली होती कीं,--

"मी हिला मला आवडेल त्याप्रमाणें शिक्षण देईन; याजबद्दल तुम्ही मागाहून कुरकूर कराल तर माझ्या कामास पडणार नाही."

स्त्री-शिक्षणाबाबत गोपाळरावाचा फार कटाक्ष होता. त्या आपल्या आवडीच्या तत्त्वासाठीं त्यानीं हरएक प्रकारचा त्याग केला आहे. गेल्या शतकाच्या उत्तरार्धात स्त्रियाना शिक्षण देण्याची कल्पनादेखील समाजात पापासमान मानली जात होती. अशा स्थितींत गोपाळरावांनी आपल्या बायकोला शिक्षण देण्याचा आग्रह धरला व तो पूर्णपणें तडीसहि नेला. त्यासाठीं त्यांना द्यावी लागलेली किंमत मात्र जबर होती. आप्तेष्टवर्गाशीं त्यांचें वितुष्ट आलें. खुद्द गोपळरावाच्या वडिलांनीं त्यांचें तोंडहि पाहावयाचें नाहीं अशी प्रतिज्ञा केली. महाराष्ट्रांत कोल्हापूर, मुंबई, अलिबाग वगैरे गांवीं ते नोकरीनिमित्त गेले; पण तेथें आपल्या बायकोला शिक्षण घेण्याच्या कामीं समाजाकडून त्रास होतो हें दिसून आल्यामुळें त्यानीं कच्छ व पुढें बगाल इतक्या लांबच्या प्रांतांत बदली करून घेतली. तेथेंहि आनंदीबाई शिक्षण घेतात म्हणून त्यांना तेथील समाजाकडून खूप त्रास झाला. पण या साऱ्या सामाजिक त्रासाला गोपाळरावांनीं धैर्यानें तोंड दिलें व आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें आपल्या बायकोला "आवडेल तितकें शिक्षण दिलें."

स्त्रीशिक्षणावरील ही जबर निष्ठा हा गोपाळरावांचा प्रशंसनीय गुण होता व त्याबद्दल आनंदीबाईनीं त्यांच्याविषयीं प्रगट केलेली कृतज्ञताहि योग्य आहे. या निष्ठेच्या वेडानेंच असेल कदाचित्, पण गोपाळरावांनीं आनंदीबाईना या शिक्षणापायीं बोचून छळलें व आनंदीबाई अमेरिकेहून डॉक्टर होऊन आल्यावरहि त्यांना "तुम्ही मोठी तलवार मारून आलांत,"

असें घालूनपाडून बोलून याच्या जीवावरच्या दुखण्यातहि एकीकडे त्यांची मनोभावाने सेवा करीत असतांना, तोंडाने आनंदीबाईना मानसिक यातना देण्यास कमी केले नाहीं! आनंदीबाईनीं शिकावें,-खूप शिकावें, शिकून सर्व हिंदी स्त्रियांना आदर्श बनावें अशी गोपाळरावाची मनःपूर्वक इच्छा होती. हा त्यांचा सुधारकी स्वभाव वाखाणण्यासारखा होता; पण त्याबरोबरच आपली बायको जास्त शिक्षणानें बेइमान बनली, चढेल झाली, घमेंडखोर झाली, वगैरे वगैरे आरोप बिचाऱ्या आनंदीबाईवर करून तिला मनस्ताप देण्याइतका संशयखोर सनातनीपणाहि त्याच्या स्वभावांत कुठें तरी लपून बसलेला दिसतो! गोपाळरावांच्या स्वभावांत जो विक्षिप्तपणा दिसून येतो तो त्यांच्या मनोवृत्तींतील या द्विदल व्यवस्थेनें आलेला आहे.

आनंदीबाईचें गोपाळरावाशीं लग्न झालें, तेव्हां त्याचें वय अकरा वर्षांचें होते. योगायोगाची गंमत अशी कीं, रमाबाई रानडयांचें लग्नहि अकराव्या वर्षीच झालें. गोपाळरावाप्रमाणेंच माधवराव रानडे विधुर होते व दोघांचीहि आपापल्या बायकांना शिकवून तयार करण्याची उमेद होती. पण एरवीं गोपाळराव आणि माधवराव या दोघांत साम्यापेक्षां विरोधच जास्त होता. माधवराव रानडे हे एक भारतीय कीर्तीचे थोर व विचारी पुढारी होते, तर गोपाळराव हे स्वतः फार न शिकलेले एक साधे पोस्टमास्तर होते. माधवरावांचा स्वभाव अत्यंत शांत व धिमा, तर गोपाळरावांचा तितकाच कोपिष्ट व उतावळा! या स्वभावभेदामुळें माधवरावांपासून रमाबाईंना सर्व प्रकारें सुखलाभ झाला, तसा गोपाळरावांपासून आनंदीबाईना होऊं शकला नाहीं. एक गोष्ट मात्र सांगितली पाहिजे कीं, रानडयांनीं रमाबाईचें सारें शिक्षण घराच्या चार भिंतींआड केलें. त्यामुळें रमाबाईंना शिक्षणापायीं सामाजिक त्रास सोसण्याची पाळी कधींच आली नाहीं. त्यांना घरांतील जीर्णमतवादी म्हाताऱ्या बायकांचीं बोलणीं खावीं लागलीं त्याचाहि बंदोबस्त माधवरावांनीं केला नाहीं! उलट गोपाळरावांनीं आपल्या पत्नीच्या शिक्षणा-

साठीं स्वतःचे आप्तेष्ट दूर सारले. आनंदीबाई शाळेंत जात, त्यामुळें त्यांना सामाजिक त्रास सोसावा लागला. त्यासाठीं गोपाळरावांनीं निरनिराळ्या गांवीं स्वतःच्या बदल्या करून घेतल्या; पण तेव्हांच्या सामाजिक कोत्या कल्पनांमुळें होणारा त्रास फारसा कमी झाला नाही.

गोपाळराव फार उतावीळ स्वभावाचे होते. लग्नानंतर तीनचार महिन्यां-नींच बायकोच्या शिक्षणाचा लकडा त्यांनीं सुरू केला. त्यापायीं गोपाळ-रावांनीं स्वतः सर्व प्रकारचा त्रास सोसला आहे, हे मी वर सांगितलेच आहे. आनंदीबाईना शाळा, शिक्षण करून घरात स्वैपाकपाणीहि करावे लागे. त्यामुळे त्या अल्पवयी बालिकेवर कामाचा बोजा पडून तिला केव्हा केव्हां कंटाळा येई. अशा वेळीं "गोपाळराव आणि आनंदीबाई दोघेहि उपाशी,–बाजाराच्या डाळफुटाण्यावर राहत. उपास घडला तरी गोपाळराव कधीं रागें भरले नाहींत; पण 'शिकण्यात मात्र कधीं अडथळा येता कामा नये' असें त्यांचें सांगणें असे."

गोपाळरावांचें आनंदीबाईवर निस्सीम प्रेम होतें व त्याना मोठेपणा प्राप्त व्हावा म्हणून त्यांनीं सर्व तऱ्हेनें काबाडकष्ट केले हें खरे आहे. आनंदी-बाईच्या मानानें आपली योग्यता कांहींच नाहीं याचीहि त्याना जाणीव दिसते. ते एका पत्रांत लिहितातः—

> "आपला (आनंदीबाईंचा) दृढनिश्चय व आपल्या मनाची शक्ति पाहून, मला वाटते, मी आपल्यापुढें काय पदार्थ आहे! हें मी खरोखर गंभीरपणानें लिहित आहें. अशी स्त्री क्वचितच दहा लाखांमध्यें एखादी आढळेल किंवा नाहीं, याचा मला संशयच वाटतो!"

आनंदीबाईविषयींची गोपाळरावांची ही भावना मनापासूनची आहे. आणि तरीहि गोपाळरावांनीं आनंदीबाईना कसें वागविलें याचें वर्णन खुद्द आनंदीबाईनींच एका पत्रांत केलें आहे तें असें,—

"आपल्या प्रिय अंतःकरणास मागील गोष्टी काढून दुखवावें अगर आपल्या प्रीतींत अंतर आणावें, असा माझा मुळींच हेतु नाहीं. फक्त जी काय माझी विनंति आहे, तो ही कीं, आपण संथपणा धारण करावा. यापेक्षां भलताच अर्थ मनांत आणूं नये. नाहीं तर तसें करून माझें अंतःकरण विदीर्ण करून टाकाल! आपण ज्या रीतीनें मला वागविलें, ती सुष्ट होती किंवा दुष्ट होती, हें ठरविणें फार कठीण आहे. जर मला विचाराल तर ती चांगली होती व नव्हती, असेंच उत्तर देईन. जर तिचा नीट विचार करून परिणाम मनांत आणला, तर ती चांगली वाटते; परंतु तिचा परिणाम लहान मुलाच्या मनावर होण्याचा कसा संभव आहे, याच न्यायदृष्टीनें जर विचार केला, तर ती रीत फारच वाईट, असें म्हणणें भाग येतें. दहावे वर्षी म्हणजे अगदींच लहानपणीं अंगावर मोडलेलीं लांकडें, बाराव्या वर्षी फेकून मारलेल्या खुर्च्या, बुकें व 'मी तुला टाकून देईन' अशा प्रकारच्या धमक्या, व तसेंच चवदाव्या वर्षी अंमलांत आणलेले नाना प्रकार, हे सर्व त्या त्या वयाच्या, शरीराच्या व मनाच्या मानानें अतेच कडक होते. लहानपणीं मुलाचें मन विकास पावलेलें व शरीर पक्व झालेलें नसतें. तेव्हां या स्थितींत मीं काय केलें, हें आपणांस माहितच आहे. आपण म्हणत होतां, त्याप्रमाणें त्या पोरकट वयांत मी आपणांस सोडून गेलें असतें तर काय झालें असतें? मी गमावलें असतें. (व अशा कितो तरी मुली सासूच्या व नवऱ्याच्या जाचानें घरदार सोडून गेल्या आहेत.) मीं जर तसें कांहीं अविचारानें केलें, तर माझ्या बापाच्या अब्रूला धक्का बसेल, ही भीति मला वाटत होती; म्हणून मीं तसें कांहीं केलें नाहीं. तसें माझ्या हातून तेव्हां होईल, असें मला मुळींच वाटत नव्हतें; (तें मी इतकी लहान असतांना माझ्या मनांत कां आलें, हें मला समजत नाहीं.) आणि आपण मला जिवंत ठेवूं नये, मारून टाकावें, अशी मीं आपणांस विनंति केली होती. आपल्या नवराबायकोंत कोणत्याहि प्रकारचें कायद्याचें बंधन कित्येक शतकांपासून नाहीं, व जरी असलें, तरी तें स्त्रियांचे विरुद्धच! आणि म्हणूनच, आपणास मजवर खुर्च्या मोडूं देऊन, गप्प बसण्याखेरीज दुसरा मार्गच नव्हता. हिंदु स्त्रीस एक चकार शब्द

> बोलण्याचा, अगर आपल्या नवऱ्यास उपदेश करण्याचा कोणताहि अधिकार नाहीं. तर उलट, नवऱ्याला काय वाटेल तें करूं देऊन गप्प बसण्याचा आहे. शांत वृत्ति हो प्रत्येक हिंदु नवऱ्यास, आपल्या बायकोपासून शिकायला उत्तम मार्ग आहे. (आतां मी जी काय झालें आहें, ही जर आपण नसतां तर कधींच झालें नसतें, हें मला समजत नाहीं असें नाहीं व त्याकरितां सदोदित मी आपली ऋणी आहे; परंतु मी अशी शांत होतें, हें आपणांस नाकबूल करितां येणार नाहीं.) मीं हें सर्व भोगायला जन्म घेतला होता."

या लांबलचक उताऱ्यावरून गोपाळराव आणि आनंदीबाई यांजमधील पतिपत्नीविषयक संबंधावर चांगलाच प्रकाश पडतो. गोपाळरावांनी आनंदीबाईंना कोंवळ्या वयात यथेच्छ मारझोडहि केली. पत्नीकडे या रानटी वृत्तीनें पाहण्याची गोपाळरावांची वृत्ति शेवटपर्यंत कायमच होती. फक्त काठीनें मारझोड करण्याऐवजीं ते पुढें शब्दानीं बायकोला झोडून काढूं लागले, एवढाच फरक ! अमेरिकेंत आनंदीबाई एकट्या राहत होत्या तेव्हां त्यांना " पत्र लिहितांना, जितके गोड शब्द घालवतील तितके घालीत जा. कारण, ती (आनंदीबाई) परमुलुखांत आलेली आहे. तिला जितकें सुख होईल तितकें दिलें तरच तिची प्रकृति बरी राहील. नाहीं तर ती मनांतल्या मनात कुढून कुढून आपल्या जीवाला अपाय करून घेईल." असा स्पष्ट इशारा गोपाळरावांना मिळाला असतांहि अगदीं क्षुल्लक कारणानें आनंदीबाईंना वाईट वाईट लिहिण्याची गोपाळरावांची खोड नाहींशी झाली नाहीं !

आनंदीबाईना गोपाळराव इतकीं उलटसुलट पत्रें लिहीत कीं, " आपल्या पत्रांचा ताळमेळ मुळींच जमत नाहीं, " असें आनंदीबाईंनीं एका पत्रांत लिहिलें आहे. एका पत्रात गोपाळरावांनीं आनंदीबाईवर बेइमानीपणाचा आरोप केला, तेव्हां आनंदीबाईंना सात्त्विक संताप आला. त्यांनीं गोपाळरावांना खडसून लिहिलें,—

> " आपण मजवर बेइमानीपणाचा आरोप ठेवाल असें मला वाटलें नव्हतें. हा आरोप सहन करणे फारच कठीण आहे. ! ...मी आपणास

खात्रीपूर्वक सांगतें कीं, जेव्हां आपला व तिचा वियोग झाला, तेव्हां जशी ती होती, तशीच व त्याच स्थितींत अद्यापहि आपली बायको आहे."

गोपाळरावांच्या स्वभावात उतावळेपणा हा मोठाच दोष दिसतो. त्यांच्या उतावळेपणानें आनंदीबाईना त्रास होई. "आपल्या नेहमींच्या उतावळेपणामुळें मला आपल्याविषयीं फारच काळजी लागते. एकदां का (आपल्या) वृत्तींत बदल झाला कीं, मग विचाराचेंदेखील वजन पडत नाहीं," असें आनंदीबाई म्हणतात. आणखी एका पत्रांत आनंदीबाईनीं लिहिलें आहे, "आपला स्वभाव अतिशय उतावीळ आहे. त्यामुळे किंचित् दिलगिरी वाटते!" गोपाळरावाना आनंदीबाईच्या स्वभावाची कल्पना कधींच आली नाहीं, याचीहि पक्की जाणीव आनंदीबाईना दिसते. "माझें अंतःकरण ह्या वेळेपर्यंत तर पूर्ण कोणास माहित नाहीं. आपणांस त्यात काय आहे, हे मात्र माहित आहे. पण ते किती खोल आहे, हें आपणास कधी कळणार नाहीं." गोपाळरावाचा उतावळा, रागीट स्वभाव आणि स्वतःची शांत वृत्ति याची जाणीव ठेवून आपल्या ठिकाणच्या संथपणाचें गोपाळरावानीं अनुकरण करावें असेहि एका पत्रांत आनंदीबाईनीं सुचवलें आहे. ही गर्वभावना नव्हती. गोपाळरावांनीं आनंदीबाईवर एकदां गर्विष्ठपणाचा आरोप केला तेव्हा त्यानीं आपल्या नवऱ्याला बजावलें,—

> "मला आज घटकेपर्यंत अभिमानाचा विटाळ झाला नाहीं व होईल तितका प्रयत्न करून त्यापासून दूर राहण्याचा माझा विचार आहे. मी इतर स्त्रियांच्या नवऱ्याप्रमाणें आपणांस समजत नाहीं व आपणहि दुसऱ्या बायकांप्रमाणें मला समजूं नये !"

नवराबायकोच्या या सर्व पत्रापत्रीवरून या दोघां पति-पत्नीचें स्वभावचित्र काढतां येते. गोपाळरावांनीं आनंदीबाईना शिकवलें व मोठेपणा प्राप्त करून दिला खरा; पण स्वतःच्या मनाचा कोतेपणा गोपाळरावांना शेवटपर्यंत टाकतां आला नाहीं! गोपाळरावांनीं मारझोड केली तेव्हां

आनंदीबाई लहान होत्या म्हणून त्यांनीं 'मला मारून टाका' अशी सूचना केली. पण आनंदीबाई प्रौढ झाल्यावर, आपल्या नवऱ्याला स्वतःच्या अंगचे शांतपणा, सोशिकपणा वगैरे गुण घेण्याचा उपदेश करण्याइतक्या धीट झाल्या आहेत. गोपाळरावांच्या अनेक उतावळ्या उद्योगांवर आनंदीबाईनीं जेथल्या तेथें खरमरीत टीका केली आहे. पण तसें करतांना गोपाळरावांना वाईट वाटूं नये म्हणून शक्य तितकी काळजीहि घेतलेली आहे.

गोपाळरावाच्या उतावळ्या व कोपिष्ट स्वभावाचे चटके शेवटपर्यंत बसत असतांहि आनंदीबाईनीं त्यांना आपले सुखनिधानच मानलें आहे. एका पत्रांत "या जगांत आपणच माझें सर्वस्व आहांत" असें त्यांनीं गोपाळरावांना उद्देशून लिहिलें आहे. दुसऱ्या एका पत्रांत आनंदीबाईनीं लिहिलें आहे कीं "माझ्या हृदयातून आपण तर दूरच होत नाहीं. मी हातांनीं जरी काम करीत असतें, तरी माझें मन एकाच विषयाकडे (गोपाळ-रावांकडे) लागलेलें असते. आपणाविषयीं चिंतन करीत असतां उल्हासवृत्ति व आशा-दया पुष्कळ असतात." गोपाळरावांचा सारा छळ सोसूनहि आनंदीबाईची त्यांच्या ठिकाणीं निष्ठा अशी होती कीं, "मी जी नम्र सेवक त्या मला माझा देह आपल्याकरितां खर्ची घालण्यास जर ईश्वर परवानगी देईल, तर मग काय आनंदच आनंद!" दुसऱ्या एका पत्रात आनंदीबाई म्हणतात, "सर्व दुःखें मी एकटी सोसण्यास तयार आहे. परंतु सर्व सुखें मात्र आपणाजवळ असतांनाच मिळावींत." आणखी एका पत्रांत त्या म्हणतात,—

> "मी आपल्याबरोबर अंधारकोठडींत जरी असलें तरी ज्या मला सुख वाटतें, तेंच मी जर एकाद्या राजमंदिरांत एकटी राहिले तर ते होणार नाहीं."

आनंदीबाईची पतिविषयक ही भावना लक्षांत घेतल्यावर गोपाळरावांनीं ज्या प्रकारानें आपल्या बायकोला वागविलें त्याचा काळेकुट्टपणा अधिकच

भीषण भासतो. गोपाळराव क्षुल्लक कारणानेंहि आपल्या बायकोवर घाणेरडे आरोप करून तिला पत्रद्वारें यातना देत, या प्रकाराबद्दल खुद्द आनंदीबाईनींच त्याची कानउघाडणी केल्याचे दाखले मीं वर दिलेच आहेत. तरीहि 'आपली पत्रें फार गोड असतात,' असे एका पत्रांत आनंदीबाईनीं लिहिलेंच आहे! गोपाळरावानीं त्यांना शिकविण्यासाठीं हवें तें केलें हें खरें, पण त्याबरोबर तिला वागवितांना फारशी माणुसकी दाखविली नाहीं असेंच आनंदीबाईच्या काहीं पत्रांवरून दिसतें. खुद्द गोपाळरावांनाहि आपल्या या वर्तनाची जाणीव दिसते. कारण ते एका पत्रांत म्हणतात,—

> "मला वाटतें मी आपणास (आनंदीबाईंना) फारच निष्ठुरपणानें वागविलें व अगदीं शेवटपर्यंत आपला संतोष ठेवण्याविषयीं मीं मुळींच यत्न केला नाहीं. या पृथ्वीवर परमेश्वरानें माझ्याहून अधिक निर्दय मनाचा प्राणी निर्माण केला नसेल!...मी निर्दय आहे, निष्ठुर आहे, तथापि माझें प्रेम तुम्हावर नाहीं असं मला वाटत नाहीं."

गोपाळरावाचा स्वभाव तऱ्हेवाइक होता व त्यामुळेंच त्यानी आनंदीबाईंना ज्या तऱ्हेने वागविले ती 'दुष्ट होती कीं सुष्ट होती, हें ठरविणें कठीण आहे,' असे आनंदीबाईचे मत झालें. योग्यतेच्या दृष्टीनें पाहिलें तर आनंदीबाईपुढे गोपाळराव अगदीं सामान्य इसम आहे. पण शेवटपर्यंत आनंदीबाई मात्र त्याच्या विलक्षण धाकांत होत्या. शेवटच्या आजारांत आनंदीबाईंना भेटावयास येणाऱ्या माणसाशीं बोलण्यानें त्यांना त्रास होई, दुखणे वाढे; म्हणून त्यानीं कोणाची भेट घेण्याचें नाकारलें तर ते गोपाळरावांना घमेंडखोरपणाचे वाटे. ते म्हणत, "तुम्ही मोठी तलवार गाजवून आलात, म्हणून लोक तुमच्या भेटीस येतात, तर त्यांचा अनादर करूं नका." वास्तविक या आजारात गोपाळरावांनीं बायकोची शुश्रूषा जीव टाकून केली. पण एकीकडे शुश्रूषा करीत असतां तिला दुसरीकडे छळण्यासहि कमी केलें नाहीं! हा छळ गोपाळरावांनीं

नकळत केला असेल, हें खरें असेल. पण जी स्त्री अमेरिकेहून डॉक्टरीण होऊन आली, जिची योग्यता गोपाळरावांहून अनंत पटींनीं मोठी होती ( खुद्द गोपाळरावांनींच तिला 'दहा लाखातील एक' म्हटलें आहे ), ती स्त्री केवळ आपली लग्नाची बायको आहे, एवढ्याच कारणासाठीं नवरेपणाचा सनातन छळवाद तिला भोगायला लावण्यांत गोपाळरावांनीं अखेरपर्यंत जरासुद्धां कसूर केली नाहीं. आनंदीबाईंनीं या छळासंबंधीं तक्रार केली नसली, तरी नवऱ्याला त्याच्या वर्तनांतील वाईटपणा पटवून देण्याचा धिटाईचा प्रत्यन पत्रद्वारा केलेला आहे. नवराबायकोमधील ही 'झक्कड' आनंदीबाईंच्या जीवनग्रंथातील एक खेदकारक पण महत्त्वपूर्ण घटणा आहे. त्याबरोबरच सुशिक्षित स्त्री व तिचा अर्धशिक्षित नवरा याजमधील मानसिक स्थितीचे चित्र पाहण्याचा 'आरसा' म्हणून तिचे वाङ्मयीन महत्त्व आज त्याहूनहि मोठें वाटते.

# आनंदी–धोंडो

नायकांच्या दृष्टिकोनांतून नवरे या मालेंतील पहिल्या दोन लेखात पतिपत्नींच्या ज्या दोन जोडयांची मीं चर्चा केली, त्यांमध्यें वय, विद्वत्ता आणि कर्तृत्त्व या दृष्टींनीं फार मोठी तफावत होती. रमाबाई रानडे या माधवरावांच्या मानाने सर्वच दृष्टींनीं खुज्या वाटतात. तसेंच डॉ. आनंदीबाई जोशी यांच्या तुलनेनें त्यांचे पति गोपाळराव हे अगदींच सामान्य गृहस्थ वाटतात. या दोन्ही जोडप्यांमध्यें वय, विद्वत्ता आणि कर्तृत्त्व याबाबत फार मोठी तफावत असल्यामुळेंच त्याच्या सांसारिक जीवनात समानतेऐवजीं विषमताच जास्त दिसून आली, हें आपण पहिल्या दोन लेखात पाहिलें. अर्थातूच ज्या कालांत रमाबाई आणि आनंदीबाई वावरत होत्या, त्या कालच्या संस्कारजन्य सामाजिक व कौटुंबिक जीवनाचा जबरदस्त पगडा व्यक्तिशः या दोन्ही स्त्रियांच्या मनावर पक्का असल्यामुळें त्यांनीं आपल्या सांसारिक जीवनांतील विषमता नैसर्गिक मानली व त्याबाबत फारशी तक्रार केली नाहीं, हा भाग वेगळा ! रमाबाई तर स्वतःला माधवरावांची ‘ सावली ’च मानीत

व परमेश्वराहूनहि पति थोर असेंहि त्यांना मधून मधून वाटे. आनंदीबाईंनींहि गोपाळरावांना परमेश्वरस्वरूप मानल्याचें त्यांच्या पत्रातील कांहीं ठिकाणच्या उल्लेखांवरून दिसतें. पण विद्वत्ता आणि कर्तृत्व या दोन्ही दृष्टींनी–विशेषतः अमेरिकेस जाऊन राहिल्यावर–आनंदीबाईंना जो आत्मविश्वास वाटूं लागला, त्याच्या जोरावर पतिराजाची पत्रातून प्रसंगीं खरड काढण्याइतका धीटपणाहि त्याच्या अंगीं पुढें पुढें आल्याचें दिसते.

पति आणि पत्नी या दोघांपैकीं एक असामान्य आणि दुसरी व्यक्ति सामान्य अशी जोडी जमल्यास पतीकडे पाहण्याची पत्नीची दृष्टि कशी बनते याचे दोन मासले मागील दोन लेखांत मीं तुम्हाला दाखवले. आता पतिपत्नी समान वयाची, समान कर्तृत्वाचीं आणि समान बुद्धिमत्तेचीं असलीं, तर अशा बायकोच्या दृष्टिकोनांतून तिच्या नवऱ्याचें चित्र कसें काय निघतें तें या लेखांत पाहूं.

डॉ. धोंडो केशव कर्वे हें नाव महाराष्ट्रांत जितकें सर्वतोमुखी आहे, तितकेंच त्यांच्या पत्नी सौ. आनंदीबाई ऊर्फ बाया याचेंहि नांव सर्वश्रुत आहे. महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षण व इतर अनेक महिलाविषयक सामाजिक सुधारणाशीं ‘आनंदीबाई व धोंडोपंत’ ही नावे जिव्हाळ्यानें निगडित झालीं आहेत. स्त्रियांच्या उद्धारासाठीं यावज्जीव कष्ट करीत राहणें हें या पतिपत्नींचें एकच जीवितकार्य झाले आहे. सुदैवाने या दोघानींहि आपापली आत्मचरित्रें लिहून प्रसिद्ध केलेलीं असल्यानें या पतिपत्नींच्या परस्परविषयींच्या भावना समजून येण्यास साधन उपलब्ध झालें आहे. डॉ. कर्वे याचे ‘आत्मवृत्त’ १९१५ सालीं प्रसिद्ध झाले व त्यानंतर २९ वर्षानीं सौ. आनंदीबाईंचे ‘माझे पुराण’ बाहेर पडलें. ‘आत्मवृत्त’ हे पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यासाठींच लिहिलेलें असल्यानें, तें साहजिकच विस्तृत व व्यवस्थेशीर आहे. उलट पक्षीं, ‘माझें पुराण’ पुस्तक लिहिलें तें प्रसिद्धीच्या हेतूनें नव्हे, तर एका दीर्घकालीन आजारांत वेळ घालविण्याचें साधन म्हणून या आठवणी लिहून काढण्यांत आल्या.

त्याचा एक फायदा असा झाला आहे कीं, या आठवणींत साहजिकच मनमोकळेपणा भरपूर आला आहे. वाईट एवढेंच वाटतें कीं, या छोटया पुस्तकाचें नाव जरी 'माझें पुराण' असें असलें, तरी पुस्तकाचे स्वरूप मात्र जंत्रीवजा टिपणासारखे त्रोटक आहे.

सौ. आनंदीबाईंच्या जीवनात त्यांना दोनदां बोहल्यावर चढावें लागलें. त्यांचे पहिलें लग्न त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षी झाले. त्यांच्या पहिल्या पतीचें आडनांव 'नातू' असें होतें. लग्नाच्या वेळीं या पतिपत्नींच्या वयांत सतरा वर्षांचें अंतर असल्याचें 'आत्मवृत्ता'त डॉ. कर्वे यानीं म्हटलें आहे. पण आनंदीबाईनीं 'माझें पुराण' मध्यें वयांत १२–१३ वर्षांचें अंतर असल्याचा उल्लेख केला आहे. हें लग्न वैशाखांत झालें व भाद्रपदांत नातू मरून बायाला आठव्या वर्षीच वैधव्य आलें. 'लहानपणींच नवरा मेल्यामुळे मला त्याचें इतके दुःख झालें नाहीं,' असें आनंदीबाईनीं म्हटलें आहे.

आनंदीबाईंचे वडील विचारानें प्रगमनशील होते व त्यांचे बधूहि सुधारणावादी असल्याने वैधव्य प्राप्त झाल्यावर आनंदीबाईंच्या शिक्षणास सुरुवात झाली. पुढें पंडिता रमाबाईनीं शारदासदनाची स्थापना केली तेव्हां तेथें पहिली विद्यार्थिनी म्हणून आनंदीबाईचेच नाव दाखल झालें. पंडिता रमाबाईंच्या सहवासाचा आणि शिक्षणाचा आनंदीबाईंच्या मनावर उत्कट व खोल ठसा उमटला व त्यांच्या हातून आयुष्यात जी थोर समाजसेवा झाली, त्याचें श्रेय खुद्द आनंदीबाईनीच पंडिता रमाबाईंच्या पदरात टाकले आहे. 'माझे पुराण' मध्ये सौ. आनदीबाई म्हणतात: —

> "पंडिता रमाबाईनीं वेळोवेळीं जो उपदेश केला, तो माझ्या मनांत मीं टिकलीप्रमाणें गोंदून ठेवला आहे. बाईंचा मला कधींही विसर पडणार नाहीं. त्या म्हणत, 'ईश्वरावर जशी श्रद्धा ठेवतात तशी कामावर ठेव व नेट दाखव, म्हणजे देव ते पार पाडायला बळ देतो.'...बाईंच्या शिकवणुकीचा व

अनुभवांचा माझ्या आयुष्यावर फार परिणाम झालेला आहे. आपल्या जातीसाठीं—बायकांसाठीं—कांहीं तरी करा अशी इच्छा त्यांच्याच उदाहरणावरून माझ्या मनांत उत्पन्न झाली. पुढें हिंगण्याचा आश्रम व इतर संस्थांकरितां जी कांहीं थोडीफार सेवा मीं केली, त्यांच्याच उपदेशाचें फळ आहे. बाई नेहमीं म्हणत, ' स्त्री हाच स्त्रीचा शत्रु आहे. स्त्रियांचा उद्धार करायला स्त्रियांनींच पुढें झालें पाहिजे. तूं आपल्या आयुष्यांत एखाद्या तरी विधवेला तुझ्याप्रमाणे शिकवलेंस, तर माझ्या शिकवण्याचें सार्थक झालें असें मी समजेन.' हा उपदेश माझ्या पुढील आयुष्यांत मीं शक्य तितका आचरणांत आणण्याचा प्रयत्न केला."

हा थोडासा लांबट उतारा देण्याचा हेतु असा कीं, आनंदीबाईंनीं आपल्या जीवनांत जी समाजसेवा केली, ती लग्नबंधनानें त्या डॉ. कर्वे यांच्याशीं जखडल्या गेल्या म्हणून नसून, ती त्यांची स्वतंत्रपणें बनलेली अंतःकरणप्रवृत्ति असल्याचें स्पष्ट व्हावें. डॉ. कर्वे आणि सौ. आनंदीबाई याना मी सुरुवातीस समान कर्तृत्वाचीं नवराबायको म्हटलें तेंहि याच अभिप्रायानें. या लेखमालेंतील पहिल्या दोन स्त्रियांना शिक्षणास व समाजकार्यास प्रवृत्त केलें तें त्यांच्या नवऱ्यानीं कांहींसें त्या बायकांच्या स्वतःच्या इच्छेविरुद्ध ! पण आनंदीबाईंच्या बाबतींत मात्र प्रकार वेगळा आहे. त्यांनीं गेली ५५ वर्षें धोंडोपंतांबरोबर सतत समाजसेवेचें आणि स्त्रीशिक्षणाचें कार्य केलेलें असलें, तरी त्या कार्याचा कित्ता आनंदीबाईंनीं त्यांची व धोंडोपंतांची दृष्टादृष्टहि होण्यापूर्वी पक्का गिरवला होता. खुद्द सौ. आनंदीबाईंनींच म्हटलें आहेः—

" लोकांसाठीं कांहीं तरी करावें अशी इच्छा मला शारदासदनांत झाली. पुढें कर्व्यांशीं लग्न झाल्यावर, त्यांच्या उदाहरणानें अशी फार इच्छा होऊं लागली व त्याच सुमारास समाजांतील निरपराध मुलें, गरीब मुलें, नाश पावत असलेलीं दिसलीं. लग्न झाल्याबरोबर माझ्या घरीं बरींच मुलें

राहत होतों...या अनाथ मुलांचे करतांना मला मनापासून आनंद वाटे आणि वाटतो."

माधवराव रानडे किंवा गोपाळराव जोशी हे अनुक्रमें रमाबाई व आनंदीबाई याचे गुरु होते, तसा प्रकार धोंडोपंत व बाया यांच्यासंबंधांत नाहीं. धोंडोपंतांच्या खांद्याला खादा लावून सौ. आनंदीबाईनीं अर्ध शतकावर सामाजिक सुधारणेचें कार्य केलेलें असले, तरी त्याची स्फूर्ति त्यांना पतीनें दिलेली नाहीं. इतकेंच काय, पण धोंडोपंतांची व त्यांची ओळख होण्यापूर्वीच आनंदीबाईनीं शाळेंत जाऊन शिक्षण घेण्यास--फार काय, पण वपन केलेले केस पुन्हा वाढविण्यासहि सुरुवात केली होती. १८९२-९३ मध्ये या प्रकारें वागणारी स्त्री ही असामान्य नीतिधैर्याची असली पाहिजे हें तत्कालीन सामाजिक बंधनाची किंचित्‌हि कल्पना असणारा कोणीहि कबूल करील.

सौ. आनंदीबाईच्या स्वभावाची ही घडण नीट लक्षात घेतल्याशिवाय, त्याच्या पतीचे त्यानीं जे चित्र काढले आहे, त्याचे मर्म बरोबर ध्यानीं येणार नाही. रमाबाई रानडे किंवा आनदीबाई जोशी या दोघीजणीच्या ठिकाणी पतीकडे परमेश्वर म्हणून पाहण्याची जी वृत्ति दिसते, तिचा संपूर्ण अभाव सौ. आनदीबाई कर्वे याच्या ठिकाणीं दिसतो. त्यानी 'माझे पुराण' मध्ये धोंडोपंताचे स्वभावचित्र आपल्या बरोबरीचा सवगडी याच दृष्टीन चितारले आहे. त्यामुळेच धोंडोपंतांच्या गुणांबरोबरच त्याच्या दोषांचेहि दिग्दर्शन थोडक्यात पण सडेतोडपणे केले आहे.

'माझें पुराण' मध्यें पतिचित्र रेखाटताना सौ. आनंदीबाईनी जेवढा मनमोकळेपणा व सडेतोडपणा दाखवला आहे, तेवढा स्वतःच्या पतीविषयीं लिहिणाऱ्या अन्य कोणा स्त्रीने दाखवलेला माझ्या पाहण्यात नाहीं. इतका मोकळेपणा आनंदीबाईच्या लिखाणांत येण्याचे कारण, आनंदीबाई व धोंडोपंत याजमधील वय, बुद्धिमत्ता व कार्यकर्तृत्व यांबाबतची समानता आणि दोघांनीं एकत्र उपभोगलेलें दीर्घकालीन सांसारिक व सामाजिक जीवन हें आहे.

आनंदीबाईंचा जन्म १८६५ मध्यें झाला. डॉ. सौ. आनंदीबाई जोशी याचाहि जन्म याच साली झाला. आनंदीबाई कर्वे यांचें पहिले लग्न १८७३ मध्यें झालें. रमाबाई रानडे याचें लग्न याच सालाच्या अखेरीस झालें. लग्नाच्या वेळीं रमाबाईंचें वय अकरा वर्षांचे होते, तर आनंदीबाई कर्वे यांचें वय अवघें आठ वर्षांचे होते. चारपाच महिन्यातच आनंदीबाईवर आकाशींची कुऱ्हाड कोसळली. पण तेव्हां त्याचें वय या घटनेचा नीट अर्थ समजण्याइतके प्रौढ नसल्याने त्यांना नवऱ्याच्या मृत्यूचे दुःख असें झालें नाहीं. वयाच्या एकविसाव्या वर्षी वपनाच्या अमंगल प्रसंगास त्यांना बळी पडावें लागलें, तेव्हां तेरा वर्षांपूर्वी मेलेल्या नवऱ्याचें त्यांना दुःख झालें ! चोविसाव्या वर्षी त्यांनी शिकण्यास आरंभ केला. रमाबाई किंवा आनंदीबाई जोशी यांच्याप्रमाणे आनंदीबाई (कर्वे) ना शिक्षण घेण्याच्या बाबतींत घरच्या माणसांची आडकाठी नसल्यानें कौटुंबिक जाच सोसावा लागला नाहीं. पुढें चार वर्षांनीं त्यानीं धोंडोपंत कर्वे यांच्याबरोबर पुनर्विवाह केला, त्यालाहि त्याचे वडील अनुकूल होते. माहेरच्या या प्रगमनशील विचारसरणीमुळें आनंदीबाईना सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रात एवढें मोठें पाऊल टाकतांना कौटुंबिक स्वरूपाचा त्रास झाला नाहीं; उलट अप्रत्यक्षपणें झालें ते साहाय्यच !

धोंडोपंताचा व आनंदीबाईंचा पुनर्विवाहापूर्वी परिचय होता. एका कुटुंबात दोघे कांहीं दिवस राहिलेलीहि होती; तेव्हा धोंडोपंत विवाहित होते. त्याची प्रथमपत्नी वारल्यावर त्यानी पुनर्विवाह करण्याचे ठरविलें व आनंदीबाईंच्या वडिलाच्या संमतीने त्यानी आनंदीबाईना त्याबाबत विचारलें. या सर्व प्रकरणात प्रेमाभ्रिमाची काही ‘ भानगड ’ नव्हती. धोंडोपंतानीं सरळ विचारलें,--

“ मी गरीब आहें. पंडिता रमाबाईकडे आहे तसें माझ्याकडे नाहीं. तुला जर माझी गरिबी पसंत असेल, तर तुझ्या वडिलांच्या म्हणण्याप्रमाणें तुझ्याशीं लग्न करण्याची माझी तयारी आहे.”

या मागणींतील व्यावहारिकता वर्णनीय आहे ! आनंदीबाईनींहि या लग्नाला मान्यता दिली ती व्यावहारिक भूमिकेवरूनच. कर्व्यांनीं आनंदीबाईंच्या नावें पॉलिसींपैकी तीन हजार रुपये ठेवण्याचा कायदेशीर लेख करून दिला व हा पुनर्विवाह झाला.

११ मार्च १८९३ रोजीं झालेला धोंडोपंत व आनंदीबाई यांचा पुनर्विवाह हा महाराष्ट्रांत सार्वजनिक रीत्या झालेला पहिला पुनर्विवाह होय. त्या विवाहाला आतां ५५ वर्षे होऊन गेलीं. आनंदीबाईंचीं दोन लग्नें झालीं; दोन्ही बिजवरांशीं. पण पहिल्या लग्नात त्यांचा नवरा त्याच्याहून सतरा वर्षांनीं मोठा होता, तर दुसऱ्या लग्नात नवराबायकोंत फक्त सातच वर्षांचे अंतर होते. लग्नानतरच्या पंचावन्न वर्षांत आनंदीबाईनीं धोंडोपंतांच्या बरोबरीनें समाजसेवेचा जो वाटा उचलला आहे, त्याची थोरवी मोठी आहे; पण त्याचा विचार प्रस्तुत लेखाच्या कक्षेत येत नाहीं.

अर्ध–शतकाच्या सहवासानंतर आनंदीबाईनीं धोंडोपंताचें स्वभावचित्रण ‘ माझें पुराण ’मध्यें केलें आहे, त्यांत कोणत्याही प्रकारची भव्यता किंवा उदात्तता नाही. कारण धोंडोपंतांचें कार्य कितीही थोर असलें, तरी त्यांचें वैयक्तिक जीवन आणि स्वभाव हीं दोन्ही अत्यंत एकमार्गी आणि वैचित्र्यशून्य आहेत. धोडोपंताचा स्वभाव धोपटमार्गी आहे व त्यानीं जें महान् कार्य केलें त्याचा पाया त्यांच्या ठिकाणची कार्यनिष्ठा आणि कष्टप्रियता यांत आहे. एरवीं त्यांच्या स्वभावांत किंवा चरित्रात वैचित्र्य किंवा वैविध्य नाहीं. त्याची बुद्धिमत्ताही असामान्य नव्हे. शिक्षण मिळून ते एम्. ए. झाले, प्राध्यापक झाले; आनंदीबाई पदवीधर झाल्या नाहींत, एवढाच फरक !

धोडोपंतांनीं आनंदीबाईंना विद्या दिली नाहीं, प्रेरणा दिली नाहीं, पैसा दिला नाहीं;—दिले काय ?–तर स्वतःच्या हातांत हात घालून आयुष्यभर काबाडकष्ट काढून समाजसेवा करण्याची संधि ! या कामात मात्र नवराबायको समानशील आहेत. आनंदीबाई काम करीत असतां त्याना धोंडोपंतांनीं रामायण वगैरे पुराणग्रंथ वाचून दाखवले असा उल्लेख ‘ माझें

पुराण 'मध्ये एके ठिकाणीं आहे. धोंडोपंत सर्व काळ आपल्याच उद्योगात गर्क असल्यानें सांसारिक कटकटींत कधी लक्ष घालीत नाहींत. पैसा थोडा मिळे व त्यांतलाही कांहीं भाग धोंडोपंतांच्या कार्यांप्रीत्यर्थ खर्च होई. त्यामुळें आनंदीबाईंना संसारयात्रा खुरडत-रखडतच करावी लागली. खुद्द प्रो. कर्वे यानींच ' आत्मवृत्तां 'त म्हटले आहे कीं,—

"मीं विशेष आसक्तीनें संसार कधींच केला नाहीं. जेव्हां जेव्हां सार्वजनिक कामांत मी गढून जातों, तेव्हां सांसारिक सुखाचा मला विसर पडतो. त्या कामांतून अवसर मिळाला म्हणजे मी संसारसुखाचे घुटके मोठ्या आवडीनें घेतों ! "

धोंडोपंतांची संसारविषयक वृत्ति ही अशी अनास्थेची आणि त्यातही उभयता पतिपत्नींनीं संसारात राहूनही वानप्रस्थाश्रमाचें जिणे जगण्यास सुरुवात करूनही आतां कैक वर्षें लोटली आहेत. अर्थात्‌च अशा अनासक्त वृत्तीच्या पतिपत्नींच्या जीवनकथेंत मामुली संसारकथाचा दुष्काळ आहे हें साहजिकच आहे. सौ. आनंदीबाई व प्रो. कर्वे यांनीं अर्धशतक एकत्र संसार केला, पण आनंदीबाईंच्या ' माझें पुराण 'मध्यें या प्रदीर्घ कालखंडात नवराबायकोत घडून आलेल्या कसल्याही बऱ्यावाईट प्रसंगाच्या गोष्टी दिलेल्या नाहींत. फक्त या दीर्घकालीन सहवासाचें सिंहावलोकन करून सौ. आनंदीबाईंनीं कर्व्यांचें स्वभावचित्र काढलें आहे तें असें,—

"नवराबायकोचा एकंदर सलोखा असेल, तर संसारांत गोडी राहते. कर्वे हे कामानिमित्त बहुतक बाहेर असत. घरचें सर्व मीच पाहीं. पण मी जे जे करीं तें तें कर्व्यांना नेहमीं पसंत असे. कारण, असं नाहीं, असें करावें, असे ते फार वेळां म्हणालेले नाहींत. बाकी ते नेहमींच अबोलपणानें वागत. कर्व्यांचें वागणें माझ्याशीं काय, मुलांशीं काय, सडेतोडपणाचें, तुटक व हिशेबी असे. मात्र कर्वे माझ्याशीं तसे वागतात हें मीं कोणाच्या लक्षांत आणून दिलें नाहीं. कित्येकदां त्यांच्या

असल्या वागण्याने मला वाईट वाटे, रागहि येई; पण मी तो दिसूं देत नसे. कारण 'मान सांगावा जनांत, अपमान सांगावा मनांत' हेंच खरें.

"कर्वे कधीं माझी बाजू घ्यायचे नाहींत. कित्येकदां असे प्रसंग आले होते कीं, कर्व्यांनीं माझ्या बाजूने दोन शब्द सांगितले असते, तर चांगले झाले असतं; पण त्यांनीं तसं केले नाहीं. अजून तें माझ्या मनांत कितीदां तरी बोचतें. मला काय, मुलांना काय किंवा इतरांना काय, आपण होऊन कांहीं सांगायला जायचे नाहींत.

"कर्वे म्हणजे एकमार्गी. आपण बरें कीं आपलें काम बरें. साधेभोळेपणा इतका कीं, इतरांच्या सहज लक्षांत येणाऱ्या गोष्टीदेखील त्यांना मुळींच दिसायच्या नाहींत. कर्व्यांचा भिडस्तपणा तर कमालीचा. कर्वे खाण्या-पिण्याच्या बाबतींत इतके साधे होते म्हणूनच माझे दिवस निभले. मी जे खायला घाली तें ते खात. कधीं कुठल्या गोष्टीला त्यांनीं नांवे ठेवलीं नाहींत.

"कर्व्यांच्या तोंडांत 'दगडे, म्हारणो' हेंच सर्वांत वाईट शब्द. याखेरीज दुसरी कोणतीहि शिवी मीं आजपर्यंत त्यांच्या तोंडांतून ऐकली नाहीं. कर्वे जितके शांत तितकेच रागीट. त्यांना संवय अशी कोणतीच नाहीं. कोणत्याच गोष्टीचा आग्रह नाहीं.

"लग्न झाल्यानंतर पहिल्याने, कधीं कोठें टांग्यांतून जावयाची वेळ आली, तर कर्वे टांगेवाल्याजवळ बसत व मी एकटीच मागें बसे. मलाहि त्या वेळच्या मानानें तें बरें वाटे. कारण नवराबायकोचें प्रेम मर्यादेतच दाखवावें लागे.

"कर्वे व्यवहाराला, पैशाला अत्यंत चोख. एक पैची अफरातफर होणार नाहीं. संस्थेच्या हिशोबांत हें ठीक आहे; पण ते घरींसुद्धां असेच वागतील. एकंदरीनें कर्वे फार शांत व धिम्या वृत्तीचे. अत्यंत करारी,— हेकट म्हणा. संसाराकडे स्वतः मन घालीत नसत. तसेंच, मीं केलेली गोष्ट त्यांनीं नापसंत केली नाहीं. अर्थात् अशा स्वभावामुळेंच मलाहि स्वतंत्र-पणें अनेक गोष्टी करतां आल्या व सर्व एकसूत्री झालें."

या लांबलचक उताऱ्यात आनंदीबाईनीं धोंडोपंतांचें स्वभावचित्र सुरेख रेखाटलें आहे. कर्वे संसारात राहूनहि विरक्त असल्यामुळें आणि त्याच्या सार्वजनिक कार्याशीं आनंदीबाई स्वतःच समरस झाल्या असल्यामुळें या विरक्त पुरुषावरहि आनंदीबाई अनुरक्त राहिल्या. कर्व्यांच्या संसारांतच नव्हे, तर त्यांच्या समाजसेवेतहि आनंदीबाईनीं त्याच्याशी सहधर्मचारिणीच्या नात्याची वागणूक ठेवली. कर्व्यांनीं आनंदीबाईना तसे कोणतेंच सुख दिले नाहीं. फार तर त्यांनीं आपल्या बायकोला जाणतेपणी कसलाहि त्रास दिला नाहीं, हा कर्व्यांचा गुण म्हणतां येईल. पण कर्व्यांनीं जरूर तेथेहि आपल्या कर्तबगार बायकोची बाजू घेतली नाहीं, ही रुखरुख आनंदीबाईच्या मनाला अजून बोंचत आहे.

रमाबाई रानड्यांप्रमाणें आनंदीबाईनीं स्वतःला धोंडोपंतांची ' सावली ' मानलें नाहीं, हे खरें आहे. भिडस्त व अनाग्रही नवऱ्याची सडेतोड बायको असल्यामुळे तशी वृत्ति त्याच्या ठिकाणीं निर्माण होणे शक्यहि नव्हते. शिवाय, कर्वे यानीं आनंदीबाईना कांहीं मोठेपणा मिळवून दिला असें म्हणवत नाहीं. आनंदीबाईचा मोठेपणा हें त्यांच्या स्वतःच्या कर्तबगारीचें फळ आहे. कर्वे यांचें तें ' दान ' नव्हे. उलट, एके ठिकाणीं आनंदीबाईनी म्हटलें आहे तें अगदींच खोटें नाहीं,--

> " केव्हां तरी गमतीनं बोलणे निघाले म्हणजे मी म्हणतें, ' उगीच लोकांनीं तुम्हांला ' महर्षि ' नांव दिले. नुसतं म्हणून घ्यायला काय ? मी जर घरांत सर्व पाहायला नसतें तर तुम्ही काय केले असतेंत ? मी होते म्हणूनच तुम्हीं एवढे मोठे झालांत. ' "

हें बोलणें थट्टेचें असलें, तरी आनंदीबाईच्या मनाचा पीळ व आत्म-विश्वास हीं त्यांत दिसून येतात. कर्व्यांची बायको म्हणूनच केवळ नव्हे, तर स्वतःच्या कर्तृत्वानें त्यांनीं कर्व्यांच्या बरोबरीनें मान व मोठेपणा मिळविला आहे.

कर्व्यांच्या स्वभावाचे पुष्कळसे सडेतोड वर्णन आनंदीबाईंनीं 'माझें पुराण' मध्यें दिलें आहे. कर्व्यांच्या बरोबर,—किंबहुना त्यांच्या आधींपासून, त्यांनीं कृतीनें समाजसुधारणेस सुरुवात केली आहे. तरीहि त्यांच्या मनात कोठें तरी 'सनातनी' पणा लपून राहिलेला असावा असें वाटतें. नवऱ्याचें नांव घेण्यासंबंधांतील त्यांची वृत्ति सनातनी स्त्रीची आहे. त्या म्हणतात,—

"मीं कर्व्यांचे नांव कधींच घेतलें नाहीं. कारण 'धोंडो' हे नांवच मला आवडत नसे. त्यामुळें मला कोणी किती अडवलं, तरी मी नांव घेण्याचं टाळीत असे. मात्र नवऱ्याचें नांव घेतलें तर आयुष्य कमी होतें, ही जुनी कल्पना मला खरी वाटत नव्हती. लग्नाच्या पूर्वी मी कर्व्यांना इतरांप्रमाणेंच 'अण्णा' म्हणत असें. पण लग्नानंतर काय म्हणणार? तेव्हां बाईंनीं (पं. रमाबाई) सुचवल्यावरून मी 'कर्वे' म्हणूं लागलें."

वास्तविक पाहतां आनंदीबाईसारख्या कर्त्या सुधारणावादी स्त्रीला लग्नानंतरहि 'अण्णा' याच नांवानें कर्वे यांना संबोधण्यास काय हरकत होती? पण मनांत खोल रुजलेल्या संस्कारांना तें मानवलें नसावें, म्हणून 'कर्वे' म्हणण्याचा इंग्रजी पर्याय त्यांना पत्करावा लागला.

हिंदु स्त्री कितीहि कर्तृत्त्वशाली व सुधारणावादी झाली, तरी ती स्वतःला आपल्या नवऱ्यापेक्षा कमी योग्यतेचीच अखेर समजते. डॉ. आनंदीबाई जोशी वास्तविक योग्यतेने गोपाळरावापेक्षां अनेकपट श्रेष्ठ होत्या; पण त्यानींहि गोपाळरावांना परमेश्वरासमानच लेखलें व त्याच्यापुढें स्वतःला तुच्छ मानिले. सौ. आनंदीबाई कर्वे याहि धोंडोपंतांच्या मानानें स्वतःला कमी योग्यतेच्या लेखतात; कारण त्या एके ठिकाणीं म्हणतात,—

"एवढ्या मोठ्या थोर गृहस्थाची मी बायको आहे व त्यांच्या कामांत मला थोडोबहुत मदत करतां आली, या कल्पनेनें मला किती आनंद व समाधान होतें याचें वर्णन करतां येणार नाहीं."

अर्थात्‌च ही लीनतेची भूमिका पत्नीनें मनानें एकदां पत्करल्यावर "आपल्या नवऱ्याचा उणेपणा जगाला दाखवूं नये," असा सनातनी सदुपदेश आनंदीबाई स्त्रीवर्गाला करतात याचें आश्चर्य वाटेनासें होतें. आणि "कर्वे जिवंत असतांना अहेवपणांतच मला मरण यावें," अशी एकच शेवटची इच्छा आनंदीबाईंच्या मनांत आतां वागत आहे हें स्वाभाविक वाटतें !

सौ. आनंदीबाई आपल्या नवऱ्याच्या स्वभावापेक्षांहि त्याच्या समाजकार्याशीं जास्त समरस झाल्यामुळें त्यांच्या संसारांत समृद्धि जरी कधीं दिसून आली नाहीं, तरी एकंदरीनें सुख व समाधान सदैव नांदतें राहिलें. धोंडोपंतांनीं त्यांना संसारांत संपूर्ण स्वातंत्र्य दिलें व इतरहि बाबतींत स्वतःची इच्छा बायकोवर लादण्याचा प्रयत्न केला नाहीं, हे खरें; पण त्यांनीं बायकोला सुख देण्याचाहि कांहीं प्रयत्न जाणीवेनें केला नाहीं. आनंदीबाईंचें त्याच यावरील प्रेम संसारदक्ष गृहिणीचें आहे, तसेंच तें सार्वजनिक कार्यक्षेत्रांतील बरोबरीच्या सहकाऱ्याचें आहे. म्हणूनच धोंडोपंतांच्या गुणदोषांची सडेतोड चर्चा करण्यास जसा त्यांना संकोच वाटत नाहीं, तद्वत् कर्व्यांच्या मोठेपणामुळेंच आपणालाहि मोठेपणा लाभला, असें सांगण्यांत त्यांना कमीपणा वाटत नाहीं. धोंडोपंतांबाबतच्या आपल्या रास्त तक्रारी आनंदीबाईनीं 'माझें पुराण' मध्यें स्पष्टपणें मांडल्या असल्या तरी त्यांत कडवटपणा नाहीं याचें कारण हेंच.

## " सहचारिणी आनंदी "

" आपण गोडधोड खावें, उत्तम घरांत राहावें, उत्कृष्ट पोषाख करावा आणि चैनीनें संसारसुख भोगावें, अशा कल्पना मला अगर आनंदीबाईला कधीं शिवल्या नाहींत. आम्हां उभयतांनाहि निसर्गाच्या शाळेंत उत्कृष्ट शिक्षण मिळून, उद्योगांत वेळ घालविणेंच आमच्या अंगवळणीं पडलें होतें. उरलेल्या वेळांत मिळणाऱ्या संसारसुखाच्या घुटक्यांनीं आमची तृप्ति होत असे. आम्ही अशा सुखाच्या कधीं पाठीला लागलो नाहीं. त्यांतल्या त्यांत सहजीं जें करून घेतां येई, तें टाकलेंहि नाहीं...आनंदीबाई शरीरानें सशक्त असून कामानें तिचें शरीर कमावलेलें होतें. नाजुकपणाचे चोंचले तिला कधीं खपले नाहींत. दळणकांडणासकट सर्व काम, गर्भावस्था बरीच पूर्णतेला येईपर्यंत हिचें चालू असावयाचें...आनंदीबाई संसारांत पडल्यानंतर तिचा विद्याभ्यास वाढविण्या-साठीं मधूनमधून प्रयत्न करण्यांत आले, पण ते साधले नाहींत. घरांत मंडळी बरीच होती, त्यामुळें घरकामाचा बोजा तिच्या अंगावर बराच असे. नव्या

संसारांत आनंदीबाईला अतिशय काम असे. ही कामाला कधी कंटाळली नाहीं. उंची कपडे अगर दागदागिने यांत तिनें कधीं लक्ष घातले नाहीं. अशा रीतीनें विशेष कांहीं न घडतां आमची संसारयात्रा बरीच वर्षें चालली.

"माझी पत्नी आनंदीबाई माझ्याप्रमाणेंच काटकसरीने वागणारी असल्यामुळें बेताच्या प्राप्तींत आम्हाला सुखानें संसार करता आला व थोडेंसें सार्वजनिक कार्यहि करतां आलें. वेडावाकडा प्रसंग आल्यास दुसऱ्यापुढें तोंड वेंगाडण्याची वेळ येऊं नये म्हणून मी आनंदीबाईस नागपुरास डफरिन इस्पितळांत मिडवाइफ्री शिकण्यासाठीं पाठवले. मिडवाइफ्रीच्या शिक्षणाचा आनंदीबाईला फार उपयोग झाला. सुखवस्तु कुटुंबांत बाळंतपणें करून तिला घरचा व्यवसाय संभाळून स्वकष्टार्जित द्रव्य संपादन करता आले. मी खर्चासाठीं दिलेल्या पैशातून बचत करून व अशा रीतीने त्यांत पुष्कळशी भर घालून आज चाळीस वर्षांत तिनें व्याजासह बरीच रक्कम शिल्लक टाकली व त्यांतला मोठा भाग म्हणजे सात हजार रुपये तिने अनाथ बालिकाश्रमाला दिले आहेत. त्यांचे व्याज तिच्या हयातींत तिला मिळावयाचें आहे, व नंतर तें आश्रमाच्या अक्षय निधींत दाखल व्हावयाचें आहे. मुलें स्वतंत्रपणें राहूं लागल्यापासून आनंदीबाई आश्रमासाठीं 'भाऊबीज फंड' जमविण्याचें व इतर प्रकारें आश्रमाकरितां वर्गणी मिळविण्याचें काम करीत आहे.

"अशा रीतीनें आमचा गृहस्थाश्रम पुरा होऊन बरींच वर्षें झालीं. हल्लीं आम्ही आधुनिक प्रकारच्या वानप्रस्थ आश्रमांत आहोंत म्हटलें तरी चालेल. आनंदीबाईनें स्वपराक्रमानें आपल्या निर्वाहाची तरतूद करून ठेवली आहे. आतां आयुष्याचे राहिलेले दिवस, घडल्यास थोडीशी सेवा करून नाहीं तर विश्रांति घेण्यांत घालवावे असा आम्हां उभयतांचा विचार आहे."

—डॉ. धोंडो केशव कर्वे
याचे आत्मवृत्त

## लक्ष्मी—नारायण

" आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी " हें रमाबाई रानडे यांचें पुस्तक एकदोन तपांपूर्वी जितकें गाजलें होतें त्यापेक्षां किती तरी अधिक लोकप्रियता "स्मृतिचित्रें" या लक्ष्मीबाई टिळकांच्या पुस्तकानें मिळविलेली आहे. कवयित्री म्हणून लक्ष्मीबाईंनीं मिळविलेला थोडासा लौकिक केवळ स्मृतिगम्य आहे, पण 'स्मृतिचित्रें' लिहून त्यांनीं कमावलेला लौकिक मात्र अमर आहे. रमाबाईंच्या 'आठवणी' आणि लक्ष्मीबाईंचीं 'स्मृतिचित्रें' हीं एकाच प्रकारचीं दोन पुस्तकें असलीं, तरी पहिल्यापेक्षां दुसरें अधिक कलापूर्ण, अधिक रसाळ व अधिक मोहक आहे. या दोनही पुस्तकांचें उद्दिष्ट एकच असलें तरी रमाबाई आणि लक्ष्मीबाई यांच्या प्रकृतिभिन्नत्वानें या पुस्तकांच्या अंतरंगांत रस, रंग आणि रुचि या दृष्टींनीं फार मोठा फरक पडलेला आहे. रमाबाईंनीं ' आठवणी ' लिहिल्या तेव्हांचा काळ आणि लक्ष्मीबाईंनीं 'स्मृतिचित्रें' लिहिलीं तेव्हांचा काळ यांजमध्यें

पुऱ्या एका पिढीच्या काळ गेलेला आहे. त्यामुळें परिस्थितींत पुष्कळच फरक पडलेला आहे. शिवाय लक्ष्मीबाईंनीं कवयित्री म्हणून थोडा कां होईना, पण लौकिक मिळविला होता व त्यांचा सारा जन्म साहित्यसेवेंत नसला तरी साहित्यिकांच्या सहवासांत गेलेला असल्यामुळें त्यांच्या मनावर साहित्यसंस्कार स्पष्ट झालेले होते, तसा प्रकार रमाबाईंच्या बाबतींत मुळींच नव्हता. रमाबाईंचा साहित्यविषयक 'व्यापारा'शीं संबंध आला तो फक्त 'आठवणी' लिहिण्यापुरताच! रमाबाईंच्या 'आठवणी' त्यांनीं लिहिल्या तशाच प्रसिद्ध झाल्या. पण लक्ष्मीबाईंच्या 'स्मृतिचित्रां' वरून सफाईचा हात फिरलेला आहे! या सर्व गोष्टी विचारात घेतल्यावर रमाबाईंच्या 'आठवणी' पेक्षां लक्ष्मीबाईंचीं 'स्मृतिचित्रें' अधिक आकर्षक व्हावींत हें स्वाभाविक वाटतें.

आठवणी लिहिण्यास रमाबाईंना त्यांची ' प्रिय कन्या सखू ' हिनें प्रवृत्त केलें. रमाबाईंना सुखकर वाटणाऱ्या माधवराव रानड्यांच्या आठवणी त्यांनीं सखूला वारंवार सांगाव्यात. त्या ऐकून ती त्यांना म्हणाली, 'या आठवणी तूं लिहून काढल्यास तर पुष्कळांना वाचावयास नाहीं का मिळावयाच्या ? नाहीं तर आमच्यासाठीं तरी त्या लिहून काढ !' रमाबाईंनीं ' प्रिय कन्ये 'च्या आग्रहामुळें ' आठवणी ' लिहिल्या, तर लक्ष्मीबाईंनींहि ' प्रिय पुत्राच्या ' आग्रहास्तवच ' स्मृतिचित्रें ' लिहिलीं. श्री. देवदत्त टिळक म्हणतात,—

" माझें चरित्र लिहावयाचें झालें तर तें घडलें तसें लिहा," असें माझ्या वडिलांनीं आम्हाला अगदीं बजावून सांगितलें होतें. त्याच्या इच्छे-प्रमाणें तसें लिहिण्यास मीं सुरुवातही केली होती. त्याच वेळीं माझ्या पुस्तकासाठीं आपल्या आठवणी लिहून देण्याचें मीं आईला सांगितलें. तिनें ताबडतोब लिहिण्यास सुरुवात केली. आईच्या आठवणींचेंच एक मोठें पुस्तक तयार होईल इतकें तें लिखाण झालें...चरित्र घडलें तसें लिहिणें घरच्याच माणसाला फारसें सोपें वाटणार नाहीं. परंतु आईनें स्वतःचीं स्मृति-चित्रें लिहून वडिलांचें घरगुती चित्र त्यांत इतक्या कुशल-

तेनें रंगविलें आहे, कीं ह्या कौशल्याबद्दल आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं. पण ह्या कौशल्याला ' माझें घडलें तसें चरित्र लिहा ' ही वडिलांची इच्छाच खरोखर कारणीभूत आहे."

' आठवणी ' व ' स्मृतिचित्रें ' हे मराठी वाङ्मयांतील मोलाचे अलंकार अशा रीतीनें अपत्यवात्सल्यापायीं घडविले गेले. दोन्ही पुस्तकांत त्या त्या लेखिकेनें आपापल्या नवऱ्याचें "घरगुती चित्र"च चितारलें आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. माधवराव रानड्यांची चौरस कार्यव्यापृतता रे. टिळकांच्या ठिकाणीं नव्हती हें खरें असलें, तरी रे. टिळकांच्या वाङ्मयीन व्यापारांचें किंवा खिस्ती मिशनविषयक कार्याचेंही वर्णन लक्ष्मीबाईंनीं 'स्मृतिचित्रां'च्या साडेतीन भागांत कुठेंहि केलेलें नाहीं. रे. टिळकांच्या काहीं कवितांचा उल्लेख ' स्मृतिचित्रां 'त आला आहे, पण त्या कविता बहुतेक कौटुंबिक स्वरूपाच्या आहेत व लक्ष्मीबाईंच्या जीवनाशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध पोंचतो म्हणूनच तो उल्लेख अपरिहार्य वाटतो. एरवीं रे. टिळकांच्या वाङ्मयसंसाराच्या वाटेलाही जाण्याचें लक्ष्मीबाईंनीं या पांचशेंसाठ पृष्ठांच्या ' स्मृतिचित्रां 'त कटाक्षानें टाळलेंं आहे. रमाबाईप्रमाणेंच लक्ष्मीबाईंनींही आपल्या नवऱ्याकडे निव्वळ संसारी दृष्टीनेंच पाहिलेलें आहे.

टिळकांचें चरित्र लक्ष्मीबाईंनीं ' घडलें तसेंच लिहिलें ' असल्याची ग्वाही श्री. देवदत्त टिळक यांनीं दिली आहे. ' माझें चरित्र घडलें तसें लिहा ' हें सांगतांना त्यांना ( टिळकांना ) हेंच सांगावयाचें होतें, कीं ' माझ्या दोषांवर मुळींच पांघरूण घालूं नका. ' असा खुलासा खुद्द लक्ष्मी-बाईंनींहि एके ठिकाणीं केला आहे. लक्ष्मीबाईंनीं पतीची ही आज्ञा पाळली असे अनेकांचे अभिप्राय आहेत. या आठवणी श्री. कृ. कोल्हटकरांना प्रथम वाचून दाखविण्यांत आल्या तेव्हां त्यांनीं लक्ष्मीबाईंना विचारलें कीं, ' काकू, हें जें तुम्हीं लिहिलं तें सर्व खरंच आहे, का कल्पना आहेत ? ' कोल्हटकरां-सारख्या रसिक व स्त्रीपक्षपाती माणसालाही अशी शंका येण्याचें कारण, ह. भ. प. पांगारकरांच्या शब्दांत सांगायचें म्हणजे असे कीं, ' ग्रंथ चरित्रपर

असून कादंबरीपेक्षां मनोहर आहे, कला आणि सत्यता यांचें त्यांत गोड मिश्रण आहे. किंबहुना, सत्यतेलाच कलेचें सहजसौंदर्य प्राप्त झालें आहे.'

'स्मृतिचित्रां' तील कला आणि सत्य यांचें प्रमाण ठरवीत बसण्याचें माझें आज उद्दिष्ट नसून लक्ष्मीबाईंच्या लेखणीनें त्यांच्या नवऱ्याचें स्वभाव-चित्र कसें रंगविलें आहे हें पाहण्याचेंच माझें काम आहे. 'स्मृतिचित्रें' पतिनिधनानंतर चौदा वर्षांनीं लिहिलेलीं आहेत. त्यांत इतर अनेक सांसारिक आठवणी आहेत; पण मी या लेखापुरतें तरी लक्ष्मी-नारायण या पतिपत्नीपुरतेंच माझें विवेचन मर्यादित ठेवणार असल्यानें त्या इतर आठवणींचा विचार करण्याचें मला कारण नाहीं.

लक्ष्मीबाईंचा जन्म १८६८ मध्यें एका खेडयांत, एका अत्यंत कर्मठ ब्राह्मण घराण्यात झाला. तेव्हां स्त्रीशिक्षण हें नरक-साधन मानण्याची सामाजिक रीत होती. त्यामुळें लक्ष्मीबाईंना विद्या घडलीच नाहीं. त्यांचें लग्न १८७९ मध्यें झालें. रमाबाई रानडे व आनंदीबाई जोशी या दोघीं-प्रमाणेंच लक्ष्मीबाईंचें लग्नही वयाच्या अकराव्या वर्षीच झालेलें आहे. फरक इतकाच कीं, पहिल्या दोघींचेही नवरे बिजवर व वयस्क होते, तर लक्ष्मीबाईंचा नवरा प्रथमवर व समवयस्क ( बायकोपेक्षां ६-७ वर्षांनीं मोठा ) होता. लग्नापूर्वी एका मैत्रिणीच्या भावानें लक्ष्मीबाईंना, खेळांत कांहीं कुरापत झाल्यामुळें, धाक घातला होता कीं, 'घरांत येशील तर तुझी तंगडीच मोडीन!' या अपमानानें छोट्या लक्ष्मीनें ( तेव्हां तिचें नांव मनू गोखले असें होतें ) प्रतिज्ञा केली होती कीं, त्या घरांत पुनश्च पाऊल टाकायचें नाहीं. पण नियति अशी कीं, तंगडी मोडण्याचा धाक दाखविणाऱ्या याच माणसाबरोबर लक्ष्मीबाईंचें लग्न झालें व ज्या घरांत पाऊलहि न टाकण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली होती, त्याच घरांत त्यांनीं पक्का पाय रोंवला! या त्यांच्या कृत्याबद्दल जरी त्या 'धमकीवाल्या' तरुणानें तेव्हां त्यांची 'तंगडी मोडली' नाहीं, तरी पुढें सांसारिक जीवनांत त्यांना अनेकदां 'यथास्थित चोप' देऊन त्यानें आपली प्रतिज्ञा अल्पांशानें कां होईना, तडीस नेलीच!

लक्ष्मीबाईंना वैवाहिक आयुष्य एकेचाळीस वर्षें लाभले व शेवटचीं पंधरा वर्षें वैधव्यावस्थेंत काढावीं लागलीं. एकेचाळीस वर्षांच्या वैवाहिक जीवनांत मध्यंतरीं पांच वर्षें पतिपत्नी एकमेकांस दूरावलीं होतीं. लग्नानंतर सोळा वर्षांनीं टिळकांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला, तेव्हा पाच वर्षें या पतिपत्नींत दुरावा निर्माण झाला होता. अखेर लक्ष्मीबाईंनींही पतीचें अनुकरण करून हा दुरावा दूर केला. लग्नानंतर लगेच आपल्या नवऱ्याचे दोन गुण लक्ष्मीबाईच्या प्रत्ययास आले व त्यांची प्रचीति नंतरच्या दीर्घकालीन वैवाहिक जीवनांत सतत येतच राहिली. पतीचें प्रेम आणि त्याचा लहरीपणा लक्ष्मीबाईंना जन्मभर पुरला. लग्नसमारंभांत भांग मिसळलेली भजीं खाऊन आपल्या बायकोला अभिष्टासारखें होऊं नये म्हणून टिळकानीं लक्ष्मीबाईच्या पानातील भजीं भर पंक्तींत काढून घेतलीं, त्या प्रसंगी जसा त्यांचा प्रेमळपणा दिसून आला, तद्वत् कोकणात त्याच्या वडिलांच्या घरीं अंगांत आलेल्या देवीनें लक्ष्मीबाईविषयीं ' ही नवी सून फार वाईट पायगुणाची आहे; हिच्यामुळें घरात सुख व शांती नांदणार नाहीं,' असें सांगितलें, तेव्हा रिवाजाप्रमाणें त्या देवीला हळदकुंकू व फुलें वाहण्याचें नाकारून टिळकानीं पुन्हा एकदा पतिप्रेमाचा प्रत्यय लक्ष्मीबाईंना आणून दिला; आणि लग्नानंतर थोड्याच दिवसांतला हा प्रसंग आहे.

टिळकाच्या वडिलांचें मत लक्ष्मीबाईविषयी चागलें नसल्यामुळें त्यांनीं टिळकाना दुसरें लग्न करण्याचा आग्रह केला व लक्ष्मीबाईंना माहेरीं टाकून देण्याची सूचना केली, तेव्हां टिळकांनी त्या वयात व त्या काळात आपल्या वडिलाना साफ सागितलें,—

" मी तसें कधींच करणार नाहीं. माझा संसार नाहीं झाला तरी असलें कृत्य माझ्या हातून कदापि घडणार नाहीं. "

या प्रसंगावरूनही टिळकांचें बायकोवरील प्रेम दिसून येतें. टिळकांनीं बायकोला ' माहेरीं नेऊन टाकण्या 'चे कृत्य कदापि केलें नाहीं हे खरे; पण स्वतःच्या घरी बायकोला टाकून जाण्याचें कृत्य टिळकानी कितीदां तरी केलें

व लक्ष्मीबाईंच्या यातना वाढविल्या. टिळकांचें संसारांत लक्ष कधींच नव्हतें व वाढत्या वयाबरोबर त्यांच्या मनाची संन्यस्त वृत्तीहि वाढूंच लागली. त्यामुळें ते मधूनमधून एकाएकीं घर सोडून निघून जात व मग त्यांची सर्वत्र शोधाशोध करावी लागे. सासरीं लक्ष्मीबाईंना लांबून विहिरीचें पाणी आणण्याचा त्रास पडूं नये म्हणून स्वतः, वडिलांना नकळत, तें काम करून, बायकोनेंच तें केलें असें भासविण्याची काळजी घेणारे टिळक हे जितके प्रेमळ, तितकेच घरात बायकोला अवाक्षरानेही न कळवितां एकदम कोठे तरी निघून जाऊन कित्येक दिवसांनीं अचानक प्रकट होणारे टिळक लहरी वाटतात. टिळक व लक्ष्मीबाई याच्या सासारिक जीवनाची जी कथा ‘ स्मृतिचित्रां ’मधून पहावयास मिळते, तिचा रंग टिळकांचा प्रेमळपणा व लहरीपणा या दोन गुणांनींच मुख्यतः चितारलेला आहे.

टिळकांच्या स्वभावाविषयीं लक्ष्मीबाईंनीं ‘ स्मृतिचित्रां ’त अनेक ठिकाणीं स्पष्ट अभिप्राय व्यक्त केला आहे. हे सारे अभिप्राय एकत्र लक्षात घेतले तर टिळकांचें स्वभावचित्र मनापुढें उभें राहतें. ते असें कीं, “ राग, प्रेमळपणा, दयालुत्व व थोडासा विक्षिप्तपणा ” हे टिळकाच्या स्वभावाचे विशेष होते. टिळकांना व्यवहारज्ञान मुळींच नव्हतें, वाटेल त्या माणसावर त्याचा चटकन् विश्वास बसत असे, पैशाच्या बाबतींत त्यांना हिशेब माहित नव्हता, मनाला पटणारी गोष्ट ब्रह्मदेव आडवा आला तरी करण्याचा हट्टीपणाही त्यांच्या ठिकाणीं होता. लक्ष्मीबाईंनीं टिळकांच्या स्वभावाविषयीं ‘ स्मृतिचित्रां ’तून वेळोवेळीं प्रकट केलेले अभिप्राय पुढीलप्रमाणें आहेत, —

> आपल्या मनाची खात्री झाल्यावर एखाद्या गोष्टीपासून त्यांना परावृत्त करण्याची ब्रह्मदेवाची प्राज्ञा नव्हती.
>
> मनाला पटेल ते करावयाचें हा एक त्यांचा पहिल्यापासून मोठा बाणा असल्यामुळें त्या काळांत अगदींच विलक्षण दिसणाऱ्या गोष्टी ते करीत.
>
> विचार अमलांत आणावयास टिळकांना फारसा वेळ लागत नसे.

टिळकांच्या स्वभावांतील हा एक विशेष होता कीं, दृष्टीसमोर असेल ते त्यांना जीव कीं प्राण असे; एकदां का एखादी व्यक्ति अगर काम दृष्टीआड झालें, कीं मग त्याची त्यांना पुष्कळदां आठवणहि राहत नसे, मग काळजी-कळकळ तर बाजूलाच राहिली.

टिळकांना आपल्या स्वभावाप्रमाणे काळजी अशी कशाची फार क्वचित वाटत असे.

टिळकांच्या मेंदूभोंवतीं एकदां विचारांचें कुंपण पडलें, कीं त्यांना बाहेरच्या वातावरणाची दाद नसे.

टिळकांच्या जवळून मीं दूर गेलें कीं, बहुतकरून ते आपल्या नोकरीचें दान आणि संसाराची दक्षिणा देऊन माझ्या मागोमाग बाहेर पडत.

स्वभावतः टिळकांना कधींच रुसतां येत नसे. ते रागावत वाटेल तितकें, पण रुसणेंफुगणें त्यांना मुळींच ठाऊक नव्हतें.

टिळक स्वभावानें अतिशय शांत पण अतिशय रागीट होते. आणि त्यांना राग येण्यास व जाण्यासही कारण अगदीं क्षुल्लक लागे.

वरून जरी कठोर मुद्रा धारण करण्याचा टिळक प्रयत्न करीत होते, तरी त्यांचें अंतःकरण मृदु असल्यामुळे त्यांना आमची दोघांची स्थिति पाहून गहिंवर येत होता.

टिळकांना भय हा शब्द त्यांच्या डिक्शनरींत कधीं सांपडला नाहीं. सभा असो, साप असो, साहेब असो, त्यांना कधीं भय वाटलें नाहीं.

टिळकांना भय कोणाचेंच कधीं वाटत नसे. जर कांहीं भय त्यांच्या हृदयांत असेल तर ते देवाचें व त्याच्या खालोखाल माझें !

टिळकांचा वाटेल त्या इसमावर विश्वास बसे. अगदीं एखादा अट्टल चोर असला व त्यानें येऊन टिळकांना सांगितलें कीं, ' मी साव आहें,' कीं ते तेवढ्यावरच तो साव आहे म्हणून विश्वास ठेवीत.

टिळक कसा तरी खर्च करीत. त्यांना व्यवहारज्ञान कमी, असा माझा समज. म्हणून मीं त्यांनीं आणलेले सर्व पैसे जप्त करून मजजवळ ठेवीत

असे. हा क्रम शेवटपर्यंत होता. त्यामुळें पैशाच्या भानगडी मला जन्मभर निस्तराव्या लागल्या.

ह्या उताऱ्यांवरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, लक्ष्मीबाईंनीं टिळकांच्या स्वभावाचीं वैशिष्ट्यें म्हणून जीं नमूद केलीं आहेत, तीं म्हणजे हट्टीपणा, उतावळेपणा, विरक्तपणा, रागीटपणा, निर्भयता, प्रेमळपणा, सालस-पणा व बेहिशेबीपणा ! लक्ष्मीबाईंनीं दिलेल्या टिळकाच्या अनेक आठवणींची छाननी केली तर त्यापैकीं प्रत्येकीचें मूळ टिळकांच्या स्वभावांतील उपर्युक्त एकाद्या गुणांतच सापडतें.

' स्मृतिचित्रां 'त लक्ष्मीबाईंनीं नवऱ्याच्या व आपल्या संबंधाच्या ज्या आठवणी दिल्या आहेत, त्यांपैकीं बहुसंख्य आठवणी नवराबायकोच्या भांड-णांच्याच आहेत. एकेचाळीस वर्षांच्या सुदीर्घ वैवाहिक आयुष्याचीं हीं ' स्मृतिचित्रें ' पाहिलीं असतां ' त्याला प्रणयाचा किंवा शृंगाराचा दूरचाहि स्पर्श ' नाहीं ही पांगारकरानीं म्हटल्याप्रमाणें या ग्रंथाची ' अपूर्वता ' आहे, यांत शंकाच नाहीं. पतिपत्नींमध्यें वारंवार खटके उडत याचे कारण टिळ-काचा स्वभाव व वृत्ति आणि लक्ष्मीबाईंचा स्वभाव व वृत्ति यांजमधील फरक हें आहे. खुद्द लक्ष्मीबाईंनीं नवराबायकोच्या स्वभावांतील व वृत्तींतील फरक ' स्मृतिचित्रां 'त काहीं ठिकाणी नमूद केला आहे तो लक्षांत घेण्यासारखा आहे:

टिळकांनीं कोणावर प्रेम केलें नाहीं ? जो कोणी त्यांना भेटे त्याच्यावर त्यांचा चटकन् विश्वास बसे. ' माणसाची खरी पारख मला आहे ' असें त्यांना वाटे. उलट मला वाटे, ' माणसाची खरी पारख मला आहे.' जो माणूस मला लफंग्या वाटे, तो टिळकांना देवदूत वाटे. ते मला म्हणत, ' तुला सॅायकॅालॅाजी कळत नाहीं.' मी म्हणे, ' मला नसेल कळत, पण मला व्यवहारज्ञान आहे.'

बाजार करण्याची त्यांना एखाद वेळेस फार हौस वाटे. आपल्यासारखे व्यवहारज्ञ कोणी नाहीं असे त्यांना वाटे व ह्यांना कोणीहि फसवावें इतका व्यवहारज्ञानाचा ह्यांचे ठायीं अभाव आहे, असे मला वाटे. 'मी खरेदी चांगली करतों, मला कोणी फसवीत नाहीं.' असें ते म्हणत, तर 'तुम्हाला खरेदी मुळींच करतां येत नाहीं, तुम्हाला सारेच फसवतात' असं मी म्हणें.

टिळकांपेक्षां आपल्याला व्यवहारज्ञान अधिक अशी मला घमेंड होती.

टिळकांची हौस कधीं लाजली नाहीं, कधीं एका बाजूला बसली नाहीं. पैसे असले कीं, लगेच चहूंकडे ती बागडायला लागे. त्यांनीं लग्नाच्या वेळीं फिकीरीची माळ माझ्या गळ्यांत घातली होती व मी बेफिकीरीची माळ त्यांच्या गळ्यांत घातली होती.

टिळकांना कर्ज करण्याची चिंता असे व मला तं फेडण्याची असे.

टिळकांना कर्ज देण्यास लोक नेहमीं तयार असत. तेव्हां माझ्याजवळ पैसा ठरणें शक्यच नसे. कारण कर्ज करावें त्यांनीं व फेडावें मी हेंहि चाललेलेंच असे.

टिळक आणि लक्ष्मीबाई यांजमध्यें नेहमीं भाडण चाले तें दोघांच्या या भिन्नप्रकृति स्वभावामुळेच. 'स्मृतिचित्रा'त असल्या भाडणांच्या किती तरी आठवणी आलेल्या आहेत. 'आम्ही खरोखरीच नेहमीं भाडत होतों. आमच्या भांडणाचे विषयही विविध असत,' असें लक्ष्मीबाईंनीं एके ठिकाणी म्हटलें आहे ते अगदीं खरें आहे. मात्र नाना संतानीं म्हटल्याप्रमाणे 'ही मोठीं मौजेची भाडणें असत.' खुद्द लक्ष्मीबाईंनींही एके ठिकाणीं या भांडणाच्या निष्फळतेचा कबुलीजबाब दिला आहे. त्या म्हणतात,—

'त्यांच्याशीं वाद घालणें म्हणजे वाऱ्याची मोट बाधण्यासारखे आहे.'

पण ही वाऱ्याची मोट बांधण्याची एकहि संधि लक्ष्मीबाईंनीं आपल्या वैवाहिक जीवनात व्यर्थ दवडल्याचं या 'स्मृतिचित्रां'वरून दिसत नाहीं.

उलट " स्वर्गात त्यांची गांठ पडली म्हणजे मी आधीं त्यांच्याशीं सपाटून भांडेन, " असें लक्ष्मीबाई म्हणत असल्याचें श्री. देवदत्त टिळक सांगतात !

निरर्थक भांडण करण्याच्या बाबतींत टिळक व लक्ष्मीबाई हीं पतिपत्नी समानशील दिसतात ! अर्थातच हीं भांडणें क्षुल्लक कारणानें पेटलेलीं व क्षुल्लक कारणानें विझलेलींही आहेत. लक्ष्मीबाईंना दुसरा मुलगा झाला तेव्हां तीन दिवसांत त्यांनीं अन्नसेवन न केल्यावरून टिळक खूप संतापले. लक्ष्मीबाईहि खाटेवर बसून त्यांच्याशी खूप भांडल्या. या भांडणाचा शेवट टिळकांनीं लक्ष्मीवर एक काव्य तयार करण्यात झाला ! टिळक व लक्ष्मीबाई यांचीं भांडणे बहुधा याच मासल्याचीं आहेत. टिळकाचें लक्ष्मीबाईवर प्रेम होतें हें मीं वर सांगितलेच आहे. ख्रिस्ती होण्याची टिळकांच्या मनाची पूर्ण तयारी झाल्यावरही " केवळ हिच्या [ लक्ष्मीबाईच्या ] धाकानें व मायेनें मी अडलो आहें. परमेश्वरा, मला व तिला सुबुद्धि दे !" अशी टिळक प्रार्थना करीत, तीहि त्यांच्या लक्ष्मीबाईवरील प्रेमाची साक्ष आहे. ' माझी आवडतीं माणसें ' या यादींत टिळकांनीं पहिला नंबर लक्ष्मीबाईंना दिला व मृत्युपत्रात लक्ष्मीबाईंना ' देवता ' म्हणून संबोधलें आहे. प्रत्यक्ष बापाचा राग पत्करूनही टिळकांनीं आपल्या बायकोचें रक्षण केलें.

इतकें प्रेम बायकोवर असूनही रागीट स्वभावामुळें टिळकांनीं लक्ष्मीबाईंना यथेच्छ गालिप्रदान केले व अनेकदां यथास्थित चोपहि दिला. एकदां तर त्यांनीं बायकोला दादरावरून खालीं ढकलली. बायकोला कांहीं न कळवतां कोठें तरी पसार होण्याचा प्रयोग तर टिळकांनीं अनेकदां केला. बायकोचें ते सहसा कधीं ऐकत नसावेत. टिळक लक्ष्मीबाईंना ' पेनी वाइज पौंड फूलिश ' म्हणत. " ही जेथें तेथें माझा पाणउतारा करते " अशी त्यांची तक्रार असे. आपली ' ओल्ड फॅशन्ड ' बायको आपलें कधींच कांहीं ऐकत नाहीं असेंही टिळक म्हणत ! लक्ष्मीबाईंना मानसशास्त्र [ सॅायकॉलॉजी ] कळत नाहीं ही तर टिळकांची पेटंट तक्रार दिसते. एकदा ते लक्ष्मीबाईंना म्हणाले,—

" मी तुला फार शहाणी समजत होतों; पण आज माझी खात्री झाली कीं, तूं फार मूर्ख आहेस. एखाद्या वेळेस तूं माझी अब्रू घालवशील ! "

'तूं फारच हट्टी बायको आहेस;' 'तुला अक्कल नाहीं;' 'जगांत मला काय मान आहे, पण तुला त्याचें कांहीं वाटत नाहीं;' 'सारा जन्म गेला; मीं सांगितलें नि तूं ऐकलें असें कधींच मला आठवत नाहीं,' वगैरे वाग्बाणांनीं टिळक रागाच्या भरांत लक्ष्मीबाईची पूजा बांधीत. रागाच्या व भांडणाच्या भरांत उच्चारलेल्या या शब्दांचा अर्थ परमार्थानें घ्यायचा नाहीं हें खरें असले, तरी टिळकांच्या मनांत आपल्या बायकोविषयीं अस्सल 'सनातनी' भावनाच नादत होत्या, एवढा तर्क यावरून काढणें चूक होणार नाहीं. 'तूं फार मूर्ख आहेस. एखाद्या वेळेस तूं माझी अब्रू घालवशील' या टिळकाच्या उद्रेकावरून टिळकांच्या मनाच्या गाभाऱ्यात बायकोच्या मूर्खपणापेक्षाही ती आपली अब्रू एखाद् वेळ घालवील याचीच चिंता जास्त दिसते !

टिळक व लक्ष्मीबाई यांजमधील भांडणें हीं पुस्तकी पंडित नवरा आणि संसारदक्ष बायको यांच्यातील भांडणें आहेत. या भांडणांचें आदिकारण लक्ष्मीबाईनींच एके ठिकाणीं दिलें आहे. टिळक रागावले म्हणजे ते लक्ष्मीबाईंना जिजाई व स्वतःला तुकारामबुवा म्हणत. अशाच एका प्रसंगीं लक्ष्मीबाई म्हणतात, —

" खरोखर मानसशास्त्र मला कांहीं कळत नव्हते व अजूनही कळत नाहीं. मला वाटते, जिजाईलाही कळत नसेल व साक्रेटिसाच्या बायकोलाही कळत नसेल. पण त्या जर आपल्या आयुष्याच्या गोष्टी लिहून ठेवत्या, तर त्यांच्या संसारांतील अडचणी लोकांच्या ध्यानांत आल्या असत्या. त्यांना दुसऱ्याच्या मनाविषयीं कांहीं कळत नसलें, तरी आपल्या स्वतःच्या मनांत काय चलबिचल होत आहे, हे चांगलें कळत असलें पाहिजे."

खुद्द टिळकांनाही या भांडणाचा नंतर पश्चात्ताप होत असावा. एकदोन कवितात त्यांनीं ही पश्चात्तापाची भावना प्रकटहि केली आहे,—

रोज जरी मी छिजला। बहु दुखवीं बोलुनि कटु शब्दाला
' दर्शन नलगे मजला। जा नीच ' जरी मी म्हणतों छिजला
वाटे सर्व जनाला। जरि त्रासुनि गेला हा भार्येला
विरहोष्णें प्रेमाला। अजि कैसा आतां ऊतच आला
नारायण लक्ष्मीला। मम लौकर देवो आणुन मजला

आणखी एका कवितेत टिळक म्हणतात,—

कांता मम हे प्रेमळ किति हे आज मला कळलें
व्यर्थ गांजितों ह्या अबलेला पश्चात्तापें मन्मन जळलें
अल्पबुद्धिनें देउ दुरुत्तर, प्राण हिचे मजवर हें कळलें
भार्या नामा योग्य सतीला आजवरी मीं व्यर्थंचि छळिलें

टिळकांची ही पश्चात्तापाची लहर फक्त काव्ये प्रसविण्यापुरतीच टिके ! काव्य संपलें की पश्चात्तापहि विरघळून जाई व पुन्हा बायकोशीं भांडण करून तिला शेलक्या विशेषणांचा अहेर देण्यास टिळक मोकळे होत !

टिळकांचें लक्ष्मीबाईवर प्रेम होतें. " आजपर्यंत वस्तुच्छायेप्रमाणें दोघें राहिलों " असल्याचा टिळकांनीं एके ठिकाणीं उल्लेख केला आहे. लक्ष्मीबाई आजारी असताना टिळकांनीं आईप्रमाणें त्यांची शुश्रूषा केल्याचें लक्ष्मीबाईंनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. टिळकांच्या बायकोवरील प्रेमाचा सर्वोत्कृष्ट पुरावा, टिळक खिस्ती झाल्यावर लक्ष्मीबाई त्यांच्याकडे राहावयास आल्या, तेव्हां मिळतो. टिळक खिस्ती व लक्ष्मीबाई हिंदु; या द्विधर्मी संसारामुळें टिळकांना एकाच घरात दोन संसार मांडावे लागले. त्या वेळचें लक्ष्मीबाईंनीं केलेलें वर्णन नमूद करण्यासारखें आहे:-

" टिळकांच्या घरांत रोज [ ख्रिस्ती ] प्रार्थना, भजन, ख्रिस्तवाचन दोन्हो सांज होत असे. माझ्या घरांत माझे सारे देव, देवी, गणपति, तुळशी ह्यांचें

पूजन झपाट्यानें चाललेलें असे. त्यांच्याकडे नोकरचाकर होते. माझ्याकडे कोणी नव्हते. मराठे मिळेनात व दुसरे खपेनात. मला सगळें हातानें करावें लागे. टिळक जेवायला माझ्या घरीं येत."

खिस्ती धर्मावर गाढ श्रद्धा असूनहि टिळकांनीं लक्ष्मीबाईंना त्यांच्या इच्छेविरुद्ध धर्मांतर करणें भाग पाडलें नाहीं. नवरेशाही अधिकार न गाजविण्यांत या बाबतींत टिळकांनीं मनाचा मोठेपणा निःसंशय दाखवला आहे. पुढें लक्ष्मीबाई स्वेच्छेनेंच पतीच्या धर्मांत गेल्या, तेव्हां अर्थातच टिळकांना आनंद झाला. लक्ष्मीबाई खिस्ती झाल्यावरहि टिळकांनीं स्वतः मुन्नाभटाच्या मुदपाकखान्यात जाण्याचा क्रम ठेवून घरीं लक्ष्मीबाईंच्या इच्छेनुसार निरामिष आहार कुटुंबासाठीं पस्तीस वर्षे ठेवला यांतही बायकोच्या भावनेचा व मताचा आदर ठेवण्याची टिळकांची वृत्ति दिसून येते.

याव्यतिरिक्त टिळकांनीं लक्ष्मीबाईंना कधीं फारसा मान दिल्याचें त्यांचीं 'स्मृतिचित्रे' सांगत नाहींत.

> "टिळकांना फार हौस कीं, आपल्या बायकोनें कोणी तरी मोठं व्हावें. लेखिका, कवयित्री, वक्ती तिनं बनावे व ते त्या दिशेने नेहमी प्रयत्न करीत. आधीं आधीं त्यांना यांपैकीं पहिल्या दोन बाबतींत अगदींच निराश व्हावे लागले, पण मग त्यांना माझ्याबद्दल फार आशा वाटूं लागली."

बायकोनें कोणी तरी मोठें व्हावें एतदर्थ टिळकांनीं काय प्रयत्न केले याचे फार त्रोटक उल्लेख 'स्मृतिचित्रा'त आहेत. लग्नानंतर लक्ष्मीबाईंना शिक्षण देण्याचा प्रयत्न टिळकांनीं केला. मात्र ती कल्पना टिळकाना स्वतः होऊन सुचली नाहीं. तर त्यांच्या शेजारीं राहणाऱ्या ब्रिन्हाडांतील "लक्ष्मीबाई खऱ्यांना लिहितांवाचतां येतें तसे लक्ष्मीबाई टिळकांनाहि आलें पाहिजे" असें टिळकांना वाटलें. "टिळकाना लहान मुलांना चांगलें शिकवतां येत असलें, तरी माझ्या बाबतींत तें अगदीं निराळेंच ठरलें." लक्ष्मीबाईंना हंसूं फार येई व त्यामुळें टिळक संतापत. शेवटीं हें शिक्षण कच्या बाराखडी-

पर्यंत गेल्यावर "हें शिक्षण देत बसण्यांत टिळकांना कांहींच गंमत वाटेना व माझें शिक्षण तेथेंच संपलें!" असें लक्ष्मीबाई म्हणतात.

टिळकांच्या स्वभावांतील ही गोम लक्षांत घेण्यासारखी आहे. लक्ष्मीबाईंनीं कोणी तरी मोठें व्हावें असें त्यांना फक्त वाटत असे. मात्र त्यासाठीं स्वतः परिश्रम घेण्यास त्यांची तयारी नसे! माधवराव रानडे व गोपाळराव जोशी यांनीं आपापल्या बायकांच्या शिक्षणाला व त्यांना मोठेपण मिळवून देण्याला जी जातीनें खटपट केली, तसें टिळकांनीं कांहींही केलें नाहीं. फक्त लक्ष्मी-बाईंनीं केलेल्या कविता सुधारून त्यांनीं त्या छापून आणल्या व ख्रिस्ती चर्चमध्यें लक्ष्मीबाईंनीं प्रथमच भाषण केलें तें टिळकांनीं लिहून दिलें होतें व तें लक्ष्मीबाईकडून पाठहि करून घेतलें होतें. या किरकोळ प्रकाराव्यतिरिक्त टिळकांनीं लक्ष्मीबाईंना "कोणी तरी मोठे" होण्याच्या दृष्टीनें कांहींही प्रत्यक्ष साहाय्य केल्याचें दिसत नाहीं. उलट, जन्मभर त्यानीं "तूं मूर्ख आहेस," "तुला अक्कल नाहीं," अशा शेलक्या शब्दानीं बायकोची शोभा करण्याचें व्रतच घेतल्याचें दिसतें.

टिळकाची काव्यरति व लक्ष्मीबाईची व्यवहारवृत्ति, टिळकांचें ध्येयवेड नि लक्ष्मीबाईचें संसारवेड, टिळकांचें शीघ्रकोपित्व आणि लक्ष्मीबाईची विनोदलोलुपता या पतिपत्नीच्या प्राकृतिक भेदामुळें त्याच्यात रमा-माधव, आनंदी-गोपाळ किंवा आनंदी-धोंडो या जोडप्यांसारखें वृत्तिसहकार्य कधींच घडून आलें नाहीं. टिळक घराबाहेरील सामाजिक कार्यांत गर्क राहिले, तर लक्ष्मीबाई घरांतील कामात गढून राहिल्या! टिळकांनीं अनेक अनाथ, अपंग लोकांना जवळ करून त्याना समाजांत प्रतिष्ठा प्राप्त करून दिली; पण स्वतःच्या बायकोला मात्र स्वतःच्या इच्छेप्रमाणें कोणीं तरी 'मोठें' होण्या-साठीं कांहींहि मदत टिळक करूं शकले नाहींत, हा फरक लक्षांत ठेवण्या-सारखा आहे. या दृष्टीनें 'बुवाचे तुरे लाल, बाईचे पुरे हाल' हे लक्ष्मी-बाईंचे उद्गार सार्थ वाटतात.

टिळकांचें प्रत्यक्ष साहाय्य झालें नसतांहि लक्ष्मीबाई मोठ्या योग्यतेस चढल्या त्या त्यांच्या अंगच्या गुणांनीं व पतीचें अनुकरण करण्याच्या त्यांच्या स्वाभाविक स्त्रीप्रवृत्तीमुळें. खुद्द लक्ष्मीबाईंनींच म्हटलें आहे,—

" वयाच्या अकराव्या वर्षापासून, म्हणजे अगदीं बाळपणापासून माझें आयुष्य एकसारखें टिळकांच्या बरोबर व बरोबरीनें चाललें होतें. मधें पांच वर्षें आम्ही विभक्त होतों, पण त्या पांच वर्षांत टिळक एक क्षणहि माझ्या–पुढून हाललें नाहींत, कीं मी त्यांच्यापुढून हाललें नाहीं. मी जी आहें ती केवळ टिळकांमुळें. टिळकांनीं आपलीं ध्येयें ठरवावीं; मीं डोळे झांकून तीं आचरणांत आणावीं; त्यांनीं कविता रचाव्या, मी त्या गाव्या; त्यांनीं भीक मागावी व मी त्यांची झोळी धरुन चालावें. आमच्यामध्यें जे खटके उडत, ते जेव्हां जेव्हां त्यांच्या प्रगतीचा वेग मला सहन होत नसे तेव्हां तेव्हां. डेक्कन–क्वीनच्या मागं एखादा खटारा बांधला व ती आपल्या पूर्ण वेगांत निघाली म्हणजे त्या खटाऱ्याची जी आदळआपट होईल ती माझी होत असे. त्यांचा वेग मला मानवेल इतपत असला व मला त्यांचीं ध्येयें पटवून घेण्यास अवसर मिळाला कीं, मग मात्र आमचें गाडें सुरळीत चाले. इंजिनाच्या अंगीं असलेली स्वयंशक्ति ती टिळकांच्या अंगीं होती, तर त्या इंजिनानें दिलेला वेग तो माझ्या अंगीं असे. एकदां रुळावर माझी गाडी लागली कीं मग मात्र ती कोणाला थांबवितां यावयाची नाहीं."

या उताऱ्यावरून मी काय म्हणतों तें तुमच्या ध्यानीं सहज येईल! लक्ष्मीबाई नवऱ्याशीं सांसारिक बाबतींत कितीहि भांडोततंडोत, टिळकांवर त्यांची आर्य स्त्रीसारखी भक्ति होती. त्यांनीं एका कवितेंत म्हटल्याप्रमाणें,—

**सुरकुळ-टिळक श्रीनारायण-चरणिं लीन आहली**
**लक्ष्मी मी-तूं हें विसरली**

या वृत्तीमुळेंच टिळकांनीं जरी बोट धरून लक्ष्मीबाईंना मोठेपणाच्या मार्गावर पावलें टाकण्यास साहाय्य केलें नसलें, तरी टिळकांच्या मागून यथाशक्ति, यथामति जाऊन लक्ष्मीबाईंनीं स्वतंत्रपणेंच मोठेपण मिळविलें.

" त्यांच्या ( टिळकांच्या )उच्च ध्येयानें परिपूर्ण अशा चरित्राचा परिणाम दुसऱ्यावर फार चटकन होत असे. नाहीं तर (कर्मठ) नारायणराव गोखले त्यांची मुलगी (लक्ष्मीबाई) भंग्याचें काम इतक्या आनंदानें व उत्साहानें

करण्यास तयार होणेंच शक्य नव्हतें. महाराचा नुसता कोठें शिंतोडा अंगावर उडाल्याचा भास झाला, तर साऱ्या जन्मभर स्वतःला व घरांतील सगळ्यांना माझ्या वडिलांनीं घासूनपुसून घेतलें होतें. त्याच पित्याची मी कन्या वांईस भंग्याच्या घरचें अन्न खातें काय नि नगरच्या दवाखान्यांत हलकीं समजलेलीं कामें करायाला धांवतें काय ? पण यांत वानायचें झालें तर तें टिळकांनाच वानलें पाहिजे. ते माझे या बाबतींत गुरु होते. त्यांनीं मार्ग दाखविला कीं त्या मार्गानें डोळे झांकून बेधडक पळण्याचें काम मात्र माझें असे. मला जर कांहीं यशाचा वांटा असेल, तर तो त्यांनीं मार्ग दाखविल्यानंतर न कचरतां त्यावरून बेधडक जाण्यांत आहे, एवढेंच."

लक्ष्मीबाईंनीं या उताऱ्यांत हाच भावार्थ प्रकट केला नाहीं काय ? याच दृष्टीनें त्यांनीं शेवटीं टिळकांना " माझा सूत्रधार " असे म्हटलें आहे. पण टिळकांनीं त्या पदवीवर आपला हक्क स्वतःच्या कृतीनें सिद्ध केलेला नाहीं हें आतांपर्यंत मीं दाखवून दिलें आहेच. ती पदवी टिळकाना लक्ष्मीबाईंमधील " सतीत्वा " नें उदारपणानें बहाल केलेली आहे हें विसरतां कामा नये !

लक्ष्मीबाई ह्या आनंदीबाई जोश्यांइतक्या बुद्धिमान् नव्हत्या ; पण रमाबाई रानडयांइतक्या मतिमंदहि नव्हत्या. आनंदीबाई कर्व्यांसारखा कष्टाळूपणा व मनाला पटलेलें कसलेंहि कार्य,—समाजाच्या स्तुतिनिंदेची पर्वा न करता, निष्ठेनें करण्याचा बाणा लक्ष्मीबाईंच्या ठिकाणीं खचित होता. टिळकांच्या अंगीं गोपाळराव जोश्यांचा विक्षिप्तपणा होता, पण त्यांच्या ठिकाणचें स्वार्थत्यागी परिश्रमशीलत्व नव्हतें. रानडयांप्रमाणें टिळकांना आपल्या बायकोनें ' मोहें ' व्हावें असें वाटत होतें, पण रानडयांप्रमाणें तो छंद तडीला नेण्याचा खिम्मेपणा त्यांच्या ठिकाणीं नव्हता. पी हळद, हो गोरी असा टिळकांचा स्वभाव होता व तसा गोरेपणा न आल्यास आरसाच फोडून टाकण्याचा त्रागाहि ते करीत ! धोंडोपंत कर्व्यांची सांसारिक विरक्ति टिळकांच्या ठिकाणीं होती, पण धोंडोपंतांनीं आपल्या मर्यादा ओळखून आनंदीबाईंना जें सांसारिक स्वातंत्र्य दिलें होतें तें देण्यास मात्र टिळकांची तयारी नव्हती. गोपाळराव

जोश्यांप्रमाणें टिळक आपल्या बायकोला मारपीट व शिवीगाळ करीत. पण जोश्यांप्रमाणें बायकोच्या मोठेपणासाठीं स्वतः कसलाही त्याग करण्यास टिळकांची तयारी नव्हती. टिळक हे कवि असल्यामुळें त्यांना चांगल्या कल्पना सुचत, पण व्यवहारविमुखतेमुळें त्या प्रत्यक्षांत उतरविण्याचे परिश्रम त्यांना झेपत नसत, असेंच टिळकांची लक्ष्मीबाईशीं जी वागणूक झाली तीवरून म्हणणें भाग पडतें. लक्ष्मीबाई सतीधर्मानुसार ह्याचें खापर स्वतःच्या ' मठ्ठ '-पणाच्या माथीं फोडीत होत्या. आनंदीबाई जोश्यासारखी बुद्धिमती स्त्रीदेखील आपल्या सर्व पराक्रमाचें श्रेय नवऱ्याच्या पदरांत टाकते, तेथें लक्ष्मीबाई-नींहि तसे केलें यात आश्चर्य नाहीं. लक्ष्मीबाई खिस्ती झाल्या होत्या, तरीहि त्यांनीं ' स्मृतिचित्रां 'त आपल्या नवऱ्याचें घरगुती नांव घेण्याचें, एखाद्या हिंदु स्त्रीप्रमाणें, टाळलें आहे व सर्वत्र ' टिळक ' असाच त्यांचा उल्लेख केला आहे, यांत तरी मग नवल कसलें ?

## लीला—माधव

रमाबाई रानडे यांचें ' आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी ' हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर जवळजवळ तीन तपांनीं श्री. लीलाबाई पटवर्धन यांचें ' आमचीं अकरा वर्षें ' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. दरम्यानच्या काळांत स्त्री-शिक्षण महाराष्ट्रांत सार्वत्रिक झालें व स्त्रीवर्गाचा सर्वच बाबतीतील दृष्टिकोन बराचसा प्रगत झाला. पतीला परमेश्वर मानण्याची रमाबाई रानडे किंवा आनंदीबाई जोशी यांच्या वेळच्या एकंदर स्त्रीसमाजाची पारंपरिक श्रद्धा या तीन तपाच्या काळांत लोप पावली व पति हा सहचर आहे असें मानण्याची नवी प्रवृत्ति शिक्षणानें, व्यक्तिविकासामुळें, सुशिक्षित स्त्रियांच्या ठिकाणीं साकार झाली होती. स्त्रीसमाजाच्या पतीकडे पाहण्याच्या एकंदर दृष्टिकोनांतच कालमान आणि समाजनीति यांनीं घडवून आणलेल्या आमूलाग्र बदलाचें प्रत्यंतर लीलाबाईंच्या " आमचीं अकरा वर्षें " या पुस्तकांत पहावयास मिळतें.

रमाबाईनीं आपल्या आयुष्यांतील कांहीं आठवणी लिहिल्या त्या मुख्यतः " जो श्रेष्ठतर सहवास " त्यांना पुन्हा लाभणें शक्य नव्हतें, त्याच्या स्मृति-सुखाचा स्वाद घेण्यासाठीं ! लक्ष्मीबाई टिळक यांनीं आपलीं " स्मृतिचित्रें " लिहिलीं तीं श्री. देवदत्त टिळक यांना रे. टिळकाचें चरित्र लिहिण्यासाठीं कच्चा माल पुरवावा म्हणून. सौ. आनंदीबाई कर्वे यांनीं ' माझें पुराण ' लिहिलें, तें दीर्घकालीन आजारांत कालहरण करण्याचें साधन म्हणून आणि डॉ. आनंदीबाई जोशी यांनीं लिहिलेलीं पत्रें अगदीं खाजगी स्वरूपाचीं होतीं व तीं प्रसिद्ध व्हावींत अशी आनंदीबाईंची बिलकुल इच्छा नव्हती. सांगण्याचें तात्पर्य असें कीं, आपापल्या नवऱ्याचें चरित्र जगाला सांगण्याच्या हेतूनें यांपैकीं कोणीहि आवर्जून लेखन केलेलें नव्हतें. अर्थात् त्यांच्या लेखनाला पुढें प्रसिद्धि मिळाल्याकारणानें त्या त्या लेखनापासून उपरोक्त कार्य कांहीं प्रमाणांत झालें आहे हें खरें; पण ग्रंथलेखन करणारांचा कांहीं तसा उद्देश नव्हता हें विसरतां कामा नये.

पण श्री. लीलाबाई पटवर्धन यांच्या " आमचीं अकरा वर्षें " या पुस्तकाची गोष्ट तशी नाहीं. हें पुस्तक लिहिण्यांत श्री. लीलाबाईंचा दुहेरी हेतु आहे. ' हृद्गतां 'त त्या म्हणतात,—

> " माझ्या मनांत पुष्कळ दिवसांपासून माधवरावांच्या सहवासांत घालविलेल्या दिवसांच्या आठवणी लिहावयाच्या होतें; परंतु मी योग्य संधीची वाट पाहत होतें. कांहीं गोष्टी कांहीं काल गेल्याखेरीज लिहिणें बरें नसतें; पण त्या लिहिल्याशिवाय चरित्रनायकाचा योग्य परिचयहि करून देतां येत नाहीं. परंतु अलीकडे मला असेंहि वाटूं लागलें आहे कीं, योग्य कालाची मी वाट पाहत बसलें व तो दुर्दैवानें माझ्या हयातींत आलाच नाहीं तर, एका महत्त्वाच्या कर्तव्याचें माझ्या हातून पालन झालें नाहीं असें होईल.
>
> " आमचें लग्न झाल्यावर माधवराव जुन्या गोष्टी सांगतांना पुष्कळ वेळां म्हणत असत, ' माझें चरित्र मीच लिहिणार आहे. माझ्या मागून दुसऱ्या

कोणी माझ्यासंबंधीं बेजबाबदारपणे कांहीं तरी लिहिण्यापेक्षां आपणच स्वतः खरी हकीगत लिहावी हें बरें. माझ्या हातून जर ही गोष्ट झाली नाहीं, तर तूं तरी अवश्य हें काम कर. ' "

अंशतः स्वतःची इच्छा, अंशतः मृत पतीची तशी आज्ञा, अंशतः परिस्थितीचा पेंच या तीन कारणांनीं श्री. लीलाबाईंना ' आमचीं अकरा वर्षें ' हें पुस्तक पतिनिधनानंतर पांचसहा वर्षांच्या आंत लिहावें लागलें आहे, असें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होतें. लीलाबाईंसारख्या सुविद्य स्त्रीला माधवरावांसारख्या महान् पुरुषाच्या आठवणी लिहिण्याची इच्छा व्हावी हें अगदीं स्वाभाविक आहे. त्यांतच माधवरावांनीं स्वतः तशी इच्छा अनेक वेळां व्यक्त केल्यानें तसें करणें हें आपलें एक ' महत्त्वाचें कर्तव्य ' असल्याची लीलाबाईंची भावना व्हावी हेंही साहजिक आहे. या दोहोंच्या जोडीला परिस्थितीच्या पेंचाची ओढ होती. माधवरावांचें आयुष्य हें अनेक गैरसमजांना जन्म देणारें ठरलें हें दुर्दैव होय ! माधवरावांसारख्या पुरुषाच्या वागणुकीचें व विचाराचें यथार्थ आकलन महाराष्ट्राला वेळींच न झाल्यामुळें त्यांच्या कृतींचा, उक्तींचा, फार काय, पण त्यांच्या वृत्तींचा देखील, त्यांच्याविषयीं गैरसमज निर्माण करण्यास व ते पसरविण्यास, त्यांच्या शत्रु-मित्रांनीं उपयोग करून घेतला. " तत्त्वें आणि व्यवहार यांची माधवरावांच्या आयुष्यांत कधींच सांगड घातली गेली नाहीं " असें श्री. लीलाबाईंनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे तेंच खरें. अशी सांगड घालण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां " लोक आपल्याला हंसतात ना ! नांवें ठेवतात ना !– तर मग ती गोष्ट ते मुद्दामच करीत." माधवरावांचा " मीं आहें तसा दिसणार ! " हा बाणा असल्यानें निव्वळ बाह्योपचारावरून माणसाची योग्यता मापणाऱ्या समाजांत त्यांच्या विचारानें, वागणुकीनें, गैरसमजच जास्त निर्माण केले. खुद्द माधवरावांनींच लीलाबाईंना पाठवलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे–" जो इतरांच्यापेक्षां थोडा निराळा वागतो तो समाजाच्या डोळ्यांत खड्याप्रमाणें सलतो. तसें माझ्या बाबतींत झाले आहे."

माधवरावांच्या बाबतींत पसरलेले गैरसमज दूर करण्यासाठीं व त्यांचें खरेंखुरें व्यक्तिदर्शन महाराष्ट्राला घडविण्यासाठीं श्री. लीलाबाईनीं ' आमचीं अकरा वर्षें ' हें पुस्तक लिहिलें. इतरांनीं आपल्यासंबंधीं मागाहून कांहीं तरी बेजबाबदारपणें लिहिण्यापेक्षां आपणच आत्मचरित्र लिहावें अशी माधवरावांची इच्छा होती व त्या दृष्टीनें त्यांनीं थोडी तयारीहि चालविली होती. पण त्यांच्या हातून तें काम पुरें झालें नाहीं, तेव्हां त्यांच्या इच्छेप्रमाणें श्री. लीलाबाईनीं हें पुस्तक लिहिलें आहे.

पुस्तक लिहितांना ' दुःखद आठवणींपेक्षां अनेक सुखदायक स्मृति ' लीलाबाईना जास्त होणें स्वाभाविक आहे. " जसजसें आठवलें तसतसें मी लिहीत गेलें. कांहीं कांहीं आठवणी दोनदोन तीनतीन वेळां लिहिल्या. बरेंचसें लिहिलेलें फाडून टाकले व कांहीं लिहिलेलें सहेतुकपणे गाळावें लागलें " असें श्री. लीलाबाईनीं म्हटलें आहे. ' काहीं लिहिलेलें सहेतुकपणें गाळावें लागलें ' या लीलाबाईंच्या विधानाचा नक्की अर्थ कळत नाहीं. " मी आहें तसा दिसणार ! " या माधवरावांच्या बाण्याला लीलाबाईनीं " सहेतुकपणें गाळलेल्या " मजकुरानें कितपत वाण लागला हेंहि समजण्यास मार्ग नाहीं. परंतु " इतरांनीं बेजबाबदारपणें काहीं तरी " लिहूं नये म्हणून स्वतःच माधवरावांच्या अधिकृत आठवणी श्री. लीलाबाईनीं लिहिल्या आहेत हें नक्की. म्हणजे एक प्रकारें माधवरावांची वकिली करण्याचा किंवा इतराचे " बेजबाबदार " हल्ले टाळण्याचा हेतु अंशतः तरी या पुस्तकाच्या बुडाशी आहे. रमाबाई रानडे, लक्ष्मीबाई टिळक किंवा सौ. आनंदीबाई कर्वे यांपैकीं कोणाच्याहि मनांत आपापले [illegible] लिहिताना असला काहीहि हेतु नव्हता. श्री. लीलाबाईंच्या ग्रंथलेखनाचा हेतु उपरोक्त तीन स्त्रियाहून वेगळा असल्याचें मी म्हणतों ते याच अर्थानें.

' आमचीं अकरा वर्षें ' हें पुस्तक ' आमच्या आयुष्यांतील काही आठवणी, ' ' माझें पुराण ' किंवा ' स्मृतिचित्रें ' यांहून कांहीं बाबतींत स्वरूपतःच वेगळें झालें आहे, याचें कारण लेखिकेचा वरील दृष्टिकोणच.

रमाबाई व लक्ष्मीबाई यांनीं आपापल्या नवऱ्यांचें फक्त कौटुंबिक जीवनांतीलच व्यक्तिचित्र चितारलें आहे. सौ. आनंदीबाईनीं डॉ. कर्वे यांच्या सार्वजनिक कार्याचा उडता उल्लेख केला आहे तो स्वतःचा त्याच्याशी संबंध आला तेवढ्यापुरताच; पण लीलाबाईनीं मात्र माधव-रावांच्या सांसारिक जीवनाबरोबरच त्यांचे थोडेसें साहित्यिक जीवन, सार्वजनिक जीवन, त्यांचे स्नेहीसोबती, वगैरेंचा समाचार घेऊन आपल्या पुस्तकाला माधवरावांच्या चरित्राची कळा आणून देण्याचा प्रयत्न केला आहे. एका दृष्टीनें ही गोष्ट स्वागतार्ह आहे. कारण, रमाबाईच्या काळची स्त्री नवऱ्याच्या घराबाहेरील कार्याची–मग तें केवढेंहि मोठें असो-वास्तपूसहि करीत नसे, त्याऐवजीं लीलाबाईच्या वेळची सुशिक्षित स्त्री नवऱ्याच्या सांसारिक जीवनाची जशी मनमोकळेपणें चर्चा करूं शकते, तद्वत् त्याच्या सार्वजनिक कार्याचीहि यथाशक्ति विचक्षणा करूं धजते ही गोष्ट बायकांच्या नवऱ्याकडे पहावयाच्या दृष्टिकोनांत पडलेल्या इष्ट बदलाची निदर्शक आहे.

लीलाबाईनी माधवरावाचें व्यक्तिचित्रण पुष्कळच खुलेपणाने केलें आहे. रमाबाई आणि आनंदीबाई जोशी यांच्याप्रमाणे पतीला परमेश्वर मानण्याची श्रद्धा लीलाबाईच्या ठिकाणीं नसल्याचा तो परिणाम आहे. रमाबाई, लक्ष्मी-बाई, आनंदीबाई याचीं लग्नें फार लहान वयात झाल्यामुळें तत्कालीन रीतीं-प्रमाणें त्या नवऱ्याच्या जीवनांत चटकन् व पूर्णपणें विलीन होऊन गेल्या. श्री. लीलाबाईचें माधवरावांशीं लग्न झालें तेव्हा त्या चोवीस वर्षांच्या व जी. ए. परीक्षेंत नापास झालेल्या होत्या. माधवराव आणि लीलाबाई याचें लग्न प्रौढ वयांत झालें होते; पण त्यांत प्रेम किंवा खुषीचा भाग नसून तो एक परिस्थिति-प्राप्त गरजेचा मामला होता. लग्नापूर्वी माधवराव व लीलाबाई याची ओळ-खहि नव्हती. आणि जेव्हां लग्नाच्या दृष्टीनें त्यांची ओळख मुद्दाम करून देण्यांत आली, तेव्हां लीलाबाईचा ग्रह माधवरावांबद्दल चांगला झाला नाही. लीलाबाई म्हणतात––" ते मला संकोची दिसले. ते फार कमी बोलत व शक्य तर बोलण्याचें टाळीत. ते थोडे त्रासिक व आपल्यांतच गढलेले असे दिसत. एकंदरींत ते माणूसघाणे असावेत असा माझा त्यांच्याबद्दलचा पहिला

ग्रह झाला. " पुढें लीलाबाईंच्या वडिलांनीं त्यांना माधवरावांबद्दल विस्तृत माहिती, फर्ग्युसन कॉलेज प्रकरणासह, सांगितली; तेव्हां लीलाबाईंनीं यत्किंचितहि न थांबता उत्तर दिलें " असल्या स्थलाबद्दल विचार न करणें बरें. " पण स्वतःचें रूप, बी. ए. च्या परीक्षेत मिळालेलें अपयश, वडिलांचा आग्रह वगैरे कारणांनीं शेवटीं स्वतःची इच्छा नसतां " मनाचा हिय्या करून " लीलाबाई या लग्नास तयार झाल्या. लग्नाच्या वेळची आपली मनःस्थिति लीलाबाईंनीं पुढीलप्रमाणें वर्णिली आहे—

> " त्यावेळीं माझ्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक होती. लग्नामुळें होणारा साहजिक आनंद मला मुळींच झाला नाहीं. वास्तविक माधवरावांच्यांत कांहींच कमी नव्हतें. ते दिसायला सुंदर होते, तरुण होते, विद्वान् होत, पदवीधर होते, नवीन मताचे व आचाराचे होते. माझ्या लग्नाबद्दलच्या अपेक्षा त्यांहून मुळींच निराळया नव्हत्या. किंबहुना माधवराव सर्व बाबतींतच अपेक्षेपेक्षाही सरस होते. त्यांची त्या वेळीं पुण्यांत जी कुप्रसिद्धि होती तशी नसती तर माझा आनंद गगनांत मावला नसता. परंतु एकच एक भूत, लग्न होईतोंवर व पुढे सहवासानें तसें कांहीं नसल्याबद्दल खात्री पटेतोंवर मला भेडसावीत होतें. पुढे सहवासानें ती भीति नष्ट झाल्यावर जेव्हां माझी खात्री झाली, तेव्हां मी त्यांच्या सहवासांत अत्यंत सुखी झालें. "

लीलाबाईंच्या पेक्षांही माधवरावांची या लग्नानें अतिशय तीव्र स्वरूपाची निराशा झाली होती. खुद्द लीलाबाईंनीं म्हटल्याप्रमाणे,—

> " माझ्याशीं त्यांचे लग्न होणे हा त्यांच्या ध्येयाचा चक्काचूरच होता."

माधवरावांच्या पत्नीबाबतच्या अपेक्षा स्पष्ट होत्या व त्या त्यांनीं अनेक वर्षें उराशीं बाळगून स्वतःच्या मानसिक पिंडात पूर्णपणें मिसळून टाकल्या होत्या.

" मला बायको शिकलेली पण सुंदर पाहिजे. मग ती परजातींतील असली तरी मला त्याची पर्वा नाहीं " असा माधवरावांचा आग्रह होता. ' प्रीति आणि सौंदर्य, विद्या व सुसंस्कृति' यांना महत्त्व देऊन एखाद्या पदवीधर महिलेशीं प्रेमविवाह करावयाच्या ध्येयानें माधवराव पछाडले होते. तें नच जमल्यास गौणपक्ष म्हणून विधवाविवाह करून सामाजिक सुधारणेस सक्रिय हातभार लावण्याचें त्यांच्या मनांत होतें, आणि जर त्यांच्या ऐन ज्वानीच्या काळांत त्यांचें ध्येय साध्य झालें असतें तर,–लीलाबाई म्हणतात,—

> " या काळांत ( रविकिरण–मंडळाच्या स्थापनेच्या काळांत ) अद्‌भुत-रम्य अशा काव्यसृष्टींत माधवराव विहार करीत होते. या वेळीं त्यांचा एखाद्या सुंदर व सुविद्य मुलीशीं परिचय झाला असता व त्याचं रूपांतर प्रेमविवाहांत झालं असतं, तर सर्व सुरळीत झालं असतं व पुणं सोडण्याची माधवरावांवर पाळी आली नसती."

पण दुर्दैवानें तसें झालें नाहीं. माधवरावांनीं सर्व प्रकारच्या आपदा व अपमान सहन केले, पण त्यांचें ध्येय साध्य झालें नाहीं, उलट त्यांचे वय वाढत गेलें व त्यांच्या चारित्र्याविषयीं गैरसमज पसरून ' असल्या माणसाशीं लग्न करण्यापेक्षा विहिरींत जीव दिलेला काय वाईट !' अशी समजूत चांगल्या सुशिक्षित व प्रौढ स्त्रियांतहि पसरली. शेवटीं माधवरावाना या लग्नाला ना-इलाजानेंच तयार व्हावें लागलें. केवळ परिस्थितिप्राप्त गरजेपार्यी त्यांना लीलाबाईशीं लग्नाला तयार व्हावें लागलें. " तुमचा स्वभाव फार चांगला आहे असें मला वामनराव (जोशी) म्हणत होते आणि म्हणूनच मी तुमच्याशीं लग्न करणार आहें, माझ्या एका प्रोफेसर मित्रानें तुमच्या रूपा-बद्दल नापसंती दर्शवली. पण मीं त्यांना हेंच सागितलें कीं, मुलगी स्वभावानें फार चांगली आहे, म्हणूनच मीं लग्नाला तयार झालों. ही गोष्ट तुमच्या पुढल्या आयुष्यांत तुम्हांला पटवून देतां आली पाहिजे." असें माधवरावांनीं लीलाबाईंना सांगितलें. चौतीस वर्षें एकाकी जीवन काढल्यावर स्वतःच्या हक्काची आप्तेष्ट-

मंडळी अडीअडचणीच्या वेळीं उपयोगी पडण्यासाठीं असावीत, आपल्या आयुष्यात ज्याचे बोलणे आपल्या मनावर दडपण पाडूं शकेल असें कोणी तरी माणूस घरात असावे, वगैरे व्यावहारिक गरजांपायीं माधवरावांना लग्नाला तयार व्हावे लागलें. शिवाय 'पत्नी ढालच कीं अब्रूची' ही समाजनीति मनाला पटल्यामुळेंहि माधवरावांना, आपल्याशीं विवाहास तयार होईल त्या स्त्रीशीं लग्नाला उभें राहणें तेव्हां आवश्यक वाटलें असलें, तर तें वावगें म्हणतां येणार नाहीं.

या लग्नांत माधवरावांना कांहींच स्वारस्य नव्हतें. सुंदर बायको मिळण्याचें त्यांचें ध्येय तर संपलेंच होतें; पण नोंदणी-पद्धतीनें लग्न करण्याची त्यांची साधी इच्छादेखील या लग्नात सफल झाली नाहीं. लग्नानंतर मित्राच्या आग्रहामुळें व काही अशी लग्न करून शिरावर घेतलेल्या नव्या जबाबदारीच्या जाणीवेमुळें माधवरावानीं स्वतःच्या इच्छेविरुद्ध कोल्हापूर संस्थानांत नोकरी पत्करली. माधवरावाचे आतापर्यंतचे आयुष्य हे ' मनाला पटेल ते निर्भयपणे करावयाचे या बाण्यानें गेलें होते. लग्नानंतर त्याना हरेक बाबतीत ' आपण आता एकटे नाहीं; दुसऱ्याचाहि विचार आता पदोपदीं आपणाला करणें भाग आहे ' ही जाणीव होऊं लागली व आतापर्यंत माधवरावांनीं तत्त्वनिष्ठेपायीं, सत्यप्रियते-मुळें, तडजोडीला मान तुकवली नव्हती, पण लग्नानंतर त्याना प्रत्येक बाबतीत तत्त्व आणि तडजोड याच्या द्वंद्वात तडजोडीला शरण जावे लागले आहे. हें करीत असतां माधवरावांच्या मानी मनाला कोण दारुण यातना झाल्या असतील याची कल्पना ' आमची अकरा वर्षें ' हे पुस्तक चागली आणून देते. निश्चयी व मेहनती स्वभावामुळें माधवरावानीं या यातनावर शेवटीं विजय कसा मिळवला याचें अत्यंत हृदयस्पर्शी चित्र श्री. लीलाबाईनीं ' आमचीं अकरा वर्षें ' या पुस्तकांत काढलें आहे.

शेवटीं शेवटीं लीलाबाई व माधवराव यांची सहवासानें व अपत्यरूप धाग्यानें मनोमिळणी झाली असली, तरी " लग्न झाल्यानंतरचे आमचे कांहीं दिवस फार चमत्कारिक गेले. फार दिवस एकटे राहिलेले माधवराव माण-

साळायला फार प्रयास पडले. प्रत्येक वेळीं पडतें आपणच घ्यावें व ते म्हणतील तसें मनाला पटत नसूनही वागावें असे प्रसंग वारंवार येऊं लागले. संसारांत गम्य व रम्य कांहीं आहे असें मला वाटेना," असें लीलाबाई म्हणतात. लीलाबाईंच्या मनांत माधवरावांविषयीं काहीं किंतु होता व माधवरावांनाहि लीलाबाई मनापासून पसंत नव्हत्या. त्यामुळें लीला-माधव याच्या संसाराची सुरुवातच मुळीं परस्पराबाबत साफ मनें नसलेल्या पण परिस्थितीनें एकत्र आणलेल्या दोन माणसासारखी चमत्कारिक झाली. प्रेमापेक्षा परकेपणाची भावना प्रभावी होती, विश्वासापेक्षा संशयाचे धुके दाट होतें. दोघांच्या वयांत दहा वर्षांचें अतर होतें. दोघांचे स्वभाव, आवडीनिवडी, विचार दृढ झालेले होते व त्यांत साम्यापेक्षां विरोधच जास्त होता. लीलाबाईनींच आपल्या संसाराच्या सुरुवातीसंबंधीं लिहिलें आहे,—

> "दिवाळीपर्यंतचे आमचे दिवस मोठे चमत्कारिक गेले. मला मानसिक ताप असह्य होऊन बारीक ताप येऊं लागला. एकदां माझ्या मनांत असेंहि आलें कीं, आतां आपण ह्यांच्यापासून कांहीं दिवस दूर राहिलें तर फार बरें होईल, आणि एक दिवस तशी गोष्ट मीं त्यांच्याजवळ काढली. मला माहेरीं जाण्याची परवानगी ताबडतोब मिळाली आणि दिवाळीच्या सुटीच्या आधींच मी पुण्याला माहेरीं आलें. ह्या सर्व अनुभवामुळें मला असें वाटूं लागलें कीं, ल्हानपणीं जीं लग्नें होतात तींच सुखाचीं. सासरच्या मंडळींची ओळख होऊन त्यांच्यांत पूर्णपणे एकरूप होण्याला पुष्कळ अवसर सांपडतो; परंतु मोठेपणच्या लग्नांत, त्यांतल्या त्यांत सुशिक्षित जोडप्यांच्या मनाचे कंगोरे कायमचे घडल्यानंतर जीं लग्नें होतात, तीं मात्र एक प्रकारें मोठ्या जबाबदारीचीं व जोखमीचीं! कारण स्वभाव बनून गेल्यानंतर एकानें दुसऱ्यासारखें वागण्याचा कितीही प्रयत्न केला, तरी प्रत्येक वेळीं तो साधतोच असें नाहीं. त्यांत अनेक ठिकाणीं खटके उडण्याचाच संभव जास्त! त्यांत आणखी नवराबायकोखेरीज तिसरं माणूस घरांत नसलें म्हणजे तर ते अग्निदिव्यच! त्यांतल्या त्यांत माझें लग्न एका ध्येयवादी माणसाशीं झालें

होते. मला स्वतःला तेव्हां कांहीं ध्येय नव्हतेंच ! ज्याच्याशीं लग्न होईल त्याच्याशीं जुळतें घेणे हेंच माझें इतर हिंदु स्त्रियांप्रमाणे ध्येय होतें."

लीलाबाई व इतर हिंदु स्त्रिया यांच्यांत परिस्थितीनें काय फरक केला होता तें माधवरावांच्याच शब्दात पाहा,—

" तुझा विवाह एका स्वप्नाळू मूर्खाबरोबर झालेला आहे. त्यामुळें व्यावहारिक मनुष्याकडून कधीहि होऊं शकत नाही, अशा तऱ्हेचा त्रास तुला सहन करावा लागतो हा विचार फार जाचक होतो."

माधवरावांनीं स्वतःला 'स्वप्नाळू मूर्ख' म्हटलें आहे. स्त्री ही पत्नी होण्यापेक्षा मैत्रिण असावी अशी माधवरावाची भावना होती. विवाहबंधनानें उत्पन्न होणारे प्रेम त्याना हिणकस वाटे. प्रेमात सत्ता व हक्क कामाचे नाहींत असें त्यानें म्हणणे होते व पतिपत्नीसंबंधात ते हटकून येतात. लीलाबाईंना त्यानीं एका पत्रांत म्हटलें आहे, " तूं माझी पत्नी आहेस त्यापेक्षां मैत्रीण असतीस तर फार बरें झालें असते."

पत्नीकडे पाहण्याचा माधवरावाचा दृष्टिकोनच सांसारिक जीवनाच्या आरंभीं, वर म्हटल्याप्रमाणे, अगदीं पृथगात्म असल्यामुळें आणि लीलाबाईंचा संसारविषयक दृष्टिकोन चारचौघींसारखाच सामान्य असल्यामुळें या नवरा-बायकोंत सुरुवातीसच सलोखा व समजूत निर्माण होऊं शकली नाहीं. " पुरुषानीं स्त्रियांना आपल्या दासी बनवूं नयेत," या मताच्या माधव-रावांना " संसारांत पूर्णपणें रमून जाणारा लीलाबाईचा स्वभाव फारसा आवडत नसे." पुढें अनुभवानें माधवरावाच्या या मतांत कांहींसा फरक झाल्याचें " आमचीं अकरा वर्षें " वाचणारांच्या ध्यानीं येईल ! पण संसाराच्या सीमेवर माधवरावाच्या 'स्वप्नाळू मूर्खपणा'चा सारा त्रास लीलाबाईंना सहन करावाच लागला !

' आमचीं अकरा वर्षें ' हें पुस्तक वाचीत असतां नवरा-बायकोच्या पूर्ण विकसित व्यक्तित्वांत महदंतर असेल तर संसार कसा होतो याचें चित्र वारंवार डोळ्यांपुढें उभें राहतें. लीलाबाई संसारांत पूर्णपणें समरस होणाऱ्या,

तर माधवरावांचें ‘ संसारांत लक्ष नाहीं ’ व गम्य नाहीं, असें हें द्वंद्व होतें ! या द्वद्वाची लीलाबाई व माधवराव याना पूर्ण जाणीव होती. माधवराव एका पत्रात लिहितात,—

‘ आयुष्यांतील बऱ्या–वाईट अनुभवांनीं स्वभावांत एक प्रकारचा तेढे-पणा आल्यावर तुझी–माझी ओळख झाली. १९१७–१८ च्या काळांत जेव्हां माझें मन अत्यंत निरामय व सुस्थित होतें, तेव्हां जर आपली ओळख होऊन विवाह झाला असता, तर मला वाटतें, मीं संसारांत अधिक रंगलों असतों. पण अजूनहि वेळ अगदींच टळली नाहीं. आपण अजूनहि सुखी होऊन सहकार्य करीत राहूं. मी असा चमत्कारिक आहें. मला संभाळून घेणें तुझें काम आहे.”

या पत्रांत माधवरावांनीं आपल्या स्वभावाचें व मनाचें पृथक्करण छान केलें आहे. लीलाबाईंशीं लग्न झाल्यामुळें जरी माधवरावाच्या वैवाहिक ध्येयांचा चक्काचूर झाला होता, तरी त्यांची कर्तव्यबुद्धि जागृत होती. ‘ मीं जबाबदारी घेण्याचें ठरविलें आहे. कधींहि कर्तव्यभ्रष्ट होणार नाहीं ” असें त्यांनीं लग्नापूर्वी लीलाबाईंना वचन दिलें होतें. लग्नानंतर माधवरावांच्या मनाला एक नवा विचार डांचूं लागला होता. तो असा—

“ आत्मसुधारणा करण्याची माझी इच्छा व माझा प्रयत्न हीं नष्ट झालेलीं नाहींत. व्यावहारिक शहाणपण मला नाहीं आणि म्हणूनच लीला, माझें भयंकर नुकसान झालें आहे...माझ्या मूर्खपणाचें फळ मला आतां एकट्याला भोगायचें नाहीं, त्याची वांटेकरीण तूं आहेस हें मी जाणून आहें. मी आतां शहाणा होणार ! ”

माधवरावांच्या स्वभावांत लग्नानंतर जो ‘ व्यावहारिक शहाणपणा ’ आला, तडजोडवादीपणा त्याच्या स्वभावांत दिसूं लागला, तत्त्वांना मुरड घालण्याकडे त्यांची प्रवृत्ति होऊं लागली, याचें कारण माधवरावांच्या मनांत उदय पाव-लेली ही नवीन जाणीव. माधवराव एकटे होते तोंवर त्यांच्या कर्मांचीं फळें त्यांना एकट्यालाच भोगावीं लागत होतीं. पण संसारांत पडल्यावर त्यांच्या

कृत्यांचे परिणाम बिचाऱ्या लीलाबाईंना भोगावे लागूं लागले, तेव्हां माधव-रावांना अत्यंत दुःख झालें.

**तूं अबला तुजवर भार कसा लादूं मी ?**

**आश्रिता जशी तूं, असुख तुला कासया ?**

या भावनेचा माधवरावांच्या स्वभावांत जोर झाल्यावर त्यांची लीलाबाईंशीं होणारी वागणूक बदलली.

त्यांतच माधवरावाच्या मनांत घर करून राहिलेल्या एका भीतीनें त्यांच्या हृदयांत सांसारिक ओलावा निर्माण करण्याचें कार्य केलें. " काळ कांहीं कोणाला सांगून येत नाहीं. समज, मी एकदम आजारी पडलों आणि मला मृत्यु आला तर तुझें कसें होईल, हा विचार आज सकाळपासून माझ्या मनांत घोळत आहे. " आपण मेल्यानंतर आपल्या बायकामुलांची दुर्दशा होऊं नये या चिंतेनें माधवरावाना या कालांत पूर्ण घेरलेलें दिसतें. ते वारंवार हा प्रश्न बोलण्यांत काढीत व बायको व मुलें यांची ' तरतूद ' करण्याच्या दृष्टीनें हरेक प्रकारें झटत. अर्थातच या सर्वंकष चिंतेनें माधवरावांच्या हळव्या मनांत लीलाबाईविषयीं प्रेम निर्माण केलें यांत नवल नाहीं. लग्नानंतर माधव-राव लीलाबाईंशीं समरस होण्याचा प्रयत्न करीत होते व लीलाबाईही त्यांचे विचार समजून घेण्यांत गढून गेल्या होत्या. पण त्या कामात सुरुवातीस तरी दोघांनाहि यश आलें नाहीं. निराशेनें लीलाबाईंनीं एकदां म्हटलेंसुद्धां आहे कीं, " मी तर तुमच्या स्वभावाशीं जुळतें घेण्याचा प्रयत्न करीत आहें. त्याकरतां मी आपल्या जिवाची आटोकाट धडपड करीत आहे. जमलें तर ठीक, नाहीं तर दुर्दैव माझें ! "

सुरुवातीस लीलाबाई व माधवराव यांच्यांत असले झगडे फार होत. इतके कीं, एकदां लीलाबाई रागावून माधवरावांना चक्क म्हणाल्यासुद्धां,—

" तुमच्या नशिबीं नरकांतच जाणें असेल तर, मी तुम्हाला स्वर्ग मिळवून देण्याचा पुष्कळ प्रयत्न करूनहि माझा हेतु तुमच्या गुणांमुळें साध्य होणार नसेल तर, कोण काय करणार ? जा खुशाल नरकांत ! "

लीला–माधव यांच्या संसारांत सुरुवातीस अशी कटुता आढळते. कारण, हा संसार म्हणजे दोन विरोधी मनोधर्मांची कुस्ती होती ! एकमेकांचीं मनें समजून घेण्याच्या प्रयत्नांत सुरुवातीपासून त्यांना यश न येण्याचें कारण दोघांचींहि मनें आरंभीं परस्परविषयीं साफ नव्हतीं. लीलाबाईंना माधवरावांच्या ‘ दंतकथित ’ पूर्वायुष्याचें मनांत भय वाटत होतें, तर माधवरावांना हें लग्न म्हणजे आपल्या ‘ वैवाहिक ध्येयांचा चक्काचूर ’ वाटत होतें. या विरोधी मनोधर्मांचा हा झगडा ‘ आमचीं अकरा वर्षें ’ या पुस्तकांत श्री. लीलाबाईंनीं अत्यंत वास्तव स्वरूपांत मांडला आहे. नवरा-बायकोच्या मानसिक गुंतागुंतीच्या व्यापारांचा ठाव घेऊं पाहाणारें असें हें पुस्तक झालें आहे व तशा प्रकारें स्वतःच्या संसाराकडे पाहून स्वतःच्या पतीचें यथार्थ व्यक्तिदर्शन घडविणारें हें मराठींतील पहिलेंच पुस्तक आहे यांत शंका नाहीं.

लीलाबाईंना संसाराची सुरुवात फार कष्टप्रद गेली. लीलाबाई म्हणतात,— “ ध्येयपूर्तता न झाल्याचें असमाधान माधवरावांना त्या काळांत ( १९२८ ते ३० ) वारंवार अस्वस्थ करीत असे ह्यांत शंका नाहीं. ते मला तसें बोलूनहि दाखवीत. केव्हां केव्हां मलाहि असें वाटे कीं, हे इतके ध्येयवादी आहेत याची थोडी जरी जाणीव मला असती, तर मी लग्नाला तयारहि झालें नसतें.” लीलाबाईंच्या संसाराच्या सुरुवातीस माधवरावांच्या मानगुटीला बसलेल्या “ वेताळा ” मुळें लीलाबाईंना अनेकदा ‘ नको हा संसार ’ असें झालें असेल हें सहज समजण्यासारखें आहे. या ‘ वेताळा ’ च्या त्रासाचें वर्णन लीलाबाईंनीं एका स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे तें वाचून लीला-माधव यांच्या संसाराची सुरुवात उभयपक्षीं कशी त्रासदायक झाली याची बरीचशी कल्पना येते.

लीलाबाईंना संसारांत जो त्रास झाला त्याबद्दलची जबाबदारी माधवरावांवर येत असली तरी, ‘ आमचीं अकरा वर्षें ’ वाचल्यानंतर माधवरावांना त्याबद्दल ‘ दोषी ’ ठरविणें चूक असल्याचें ध्यानीं येतें. कारण माधवराव त्या वेळीं आपल्या ध्येयवेड्या विचारानुसार वागत असल्यामुळें

लीलाबाईंच्या मनाचा फारसा विचार त्यांनीं या कालांत केलाच नाहीं असें दिसतें. "आजपर्यंत मला कोठेंहि एकट्यानें जायची संवय. दुसऱ्या माणसाच्या सोयी-गैरसोयींचा विचार करावयाची मला पाळीच अली नाहीं;" "आजपर्यंत मी एकटा होतों. मला आपलें लग्न झालें आहे ह्याचें स्मरण राहत नाहीं. तूं रागावूं नकोस!" असें माधवराव लीलाबाईंना उद्देशून वारंवार म्हणत तें याच कालांत. लग्न झाल्यानंतर आपल्या कांहीं लहरी माधवरावांनीं लीलाबाईंवर सक्तीनें लादण्याचा प्रयत्न चालवला. मात्र त्यांत त्याचा हेतु बायकोवर नवरेपणाचा अधिकार गाजवावा हा नसून माधवरावांना जीं तत्त्वे पटलीं होतीं तीं अंमलांत आणण्याचा त्यांचा तो एक प्रयत्न होता. "पुरुषांनीं स्त्रियांना आपल्या दासी बनवूं नयेत असें त्यांचें स्पष्ट मत होतें आणि तें आचरणांत आणण्याची ते फार दक्षता घेत." "माधवरावांना पहिल्यापासून असें वाटे कीं, मी स्वावलंबी व्हावें. नवऱ्याच्या कीर्तीवर बायकोचा मोठेपणा म्हणजे कांहीं तो खरा मोठेपणा नव्हे." "तुझी विद्या तूं कायम ठेवली नाहींस, तर इतक्या शिकण्याचा फायदा काय? आणि कोणी सांगावें, कोणावर काय प्रसंग येईल? तुलाहि एखाद्या अडचणीच्या प्रसंगीं नोकरी करावी लागेल." या तीन उताऱ्यांत दिलेल्या विचारसरणीचा तेव्हां माधवरावांच्या मनावर जबर पगडा होता. आणि याच विचारांच्या आहारीं गेल्यामुळें माधवरावांचा लीलाबाईंनीं 'दिवसाकाठीं काहीं तरी वाचल पाहिजे असा कटाक्ष होता.' घरकामांत सारा दिवस घालवण्यापेक्षां स्वयपाकांत दोन पदार्थ कमी करूनहि लीलाबाईंनीं विद्या वाढवावी असा माधवरावांचा आग्रह होता. यासाठींच लीलाबाईंना पुण्यास ठेऊन त्यांनीं त्यांच्या करवीं जी. ए. ची परीक्षा देववली व नंतर बेळगांवास लीलाबाईंना नोकरीचाहि अनुभव घेऊं दिला. पुस्तकी विद्येचें माधवरावांना एवढें वेड होतें कीं, "विणकाम, भरतकाम ह्यांत डोळे बिघडवून घेण्यापेक्षां वाचन कर. तें तुझ्या जास्त उपयोगी पडेल!" असें ते वारंवार म्हणत. लीलाबाईंना असलेली गाण्याची आवड माधवरावांनीं जोपासली नाहीं. विणकाम, भरतकाम यांसारख्या स्त्रियांच्या साहजिकच आवडत्या कलांमध्यें त्यांना

लक्ष घालूं दिलें नाहीं. फार काय, पण घर सजवण्याची लीलाबाईंना असलेली हौसदेखील माधवरावांमुळें त्यांना कायमची बाजूला ठेवावी लागली! "ज्याच्याशीं लग्न होईल त्याच्याशीं जुळतें घेणें हेंच माझें इतर हिंदु स्त्रियांप्रमाणें ध्येय होतें" असें लीलाबाईंनीं म्हटलें आहे तें किती सार्थ आहे हें, अशा बारीकसारीक बाबतींतदेखील आपल्या आवडीनिवडी नवऱ्याच्या लहरींना बळी देऊन, त्यांनीं सिद्ध केलें आहे!

लीलाबाईंनीं शिकावें हा माधवरावांचा विचार वावगा मुळींच नव्हता. या विचाराची उत्कटता सुरुवातीस इतकी जबर होती कीं एकदां स्वतः लीलाबाईंना शिकवीत असतां, त्यांनीं नेमून दिलेले शब्द कोशांतून काढले नाहींत म्हणून, माधवरावांनीं रागाच्या भरांत त्यांचा कान पिरगळला! हा एक विषादकारक प्रसंग, माधवरावांच्या मनांत तेव्हां पुस्तकी विद्येचें केवढें जबर वेड होतें, तें सांगतो. पुढें लीलाबाई जी. ए. झाल्या हें एक व दुसरें अनुभवानें माधवरावांच्या विचारांत बदल झाला, म्हणून या प्रकारची पुनरावृत्ति झाली नाहीं व लीलाबाईंनाहि पुस्तकी वाचनाची सूट मिळाली हा भाग वेगळा.

माधवरावांच्या मनांत काहीं कल्पना पक्क्या भिनल्या होत्या. त्यांची सौंदर्यप्रीति इतकी तरल होती कीं, त्यांना आपल्या बायकोचें नांव 'गंगू' आहे या गोष्टीचाही विलक्षण विषाद वाटे! लीलाबाईंना कोणी 'गंगू' या माहेरच्या नांवानें हाक मारली, कीं माधवरावांचा 'वेताळ' जागा होई. असल्या क्षुल्लक बाबतींतहि मनस्ताप करून घेण्याचा त्यांचा स्वभाव त्यांच्या दीर्घकालीन एकाकी व एककल्ली जीवनानें घडविला होता. लग्नाच्या दिवशींच लीलाबाईंना "कुंकूं लहान कर व मंडळींत ये" असें फर्मान माधवरावांनीं सोडलें. त्याच वेळीं लीलाबाईंच्या सुसंस्कृत मनाला जाणीव झाली कीं, "आतां पतीच्या आज्ञेप्रमाणेंच वागलें पाहिजे." आपली बायको अमुक प्रकारची व्हावी अशी माधवरावांची अपेक्षा होती. "तिनें ज्या प्रकारचें व्हावें अशी माझी इच्छा आहे, त्या प्रकारची ती खात्रीनें होईल" असा आशावादहि त्यांच्या मनांत होता.

आपली बायको कशा प्रकारची व्हावी हें माधवरावांनीं स्वतःच्या मनानेंच ठरविले होतें. लीलाबाई प्रौढ व पदवी-परीक्षेपर्यंत शिकलेल्या असतांहि या बाबतींत माधवरावांनीं त्यांचा बिलकुल विचार घेतला नव्हता! फार काय पण घरांत सुपारी ठेवावी किंवा नाहीं, असल्या क्षुल्लक बाबतींतहि माधवराव आपला तत्त्वनिष्ठ हेका चालवीत व त्यामुळें अनेकदां गृहिणी या नात्यानें लीलाबाईंना त्रास होई; याचीं कांहीं उदाहरणें ' आमचीं अकरा वर्षें ' मध्यें दि [illegible] आहेत. " माझ्या आज्ञेला निमूटपणें मान तुकवण्याऐवजीं तिची उपयुक्तता समजून घे...तुला स्वतःला विचार करायला शिकलें पाहिजे," असें माधवराव म्हणत खरें, पण तसें करण्याची सवड मात्र त्यांनीं सुरुवातीस तरी लीलाबाईंना दिली नाहीं, असें नाइलाजानें म्हणावें लागतें. माधवरावांच्या या वागणुकीची दोन कारणें या पुस्तकांस विचारी वाचकाला सांपडण्यासारखीं आहेत. एक, सुरुवातीस " मी कित्येक वेळां एकटा नाहीं हें विसरतों " ही माधवरावांची सहज प्रवृत्ति; आणि दुसरें, खुद्द लीलाबाईंची ' सदोदित धाकांत वागण्याची संवय.' माधवराव आपल्यापेक्षां वयानें, अनुभवानें मोठे आहेत या भावनेनें व बालपणापासून मनावर झालेल्या आज्ञाधारकपणाच्या संस्कारामुळें लीलाबाईंनीं ' ज्याच्याशीं लग्न झाले त्याच्याशीं जुळतें घेण्याचेंच हिंदु स्त्रियांचें व्रत ' सहजगत्या अवलंबिले.

एकदोन प्रसंगीं लीलाबाईंनीं माधवरावांना आपल्या मनांतले विचार स्पष्टपणें सुनविले, तेव्हां मात्र त्याचा इष्ट तो परिणाम झाला. जुन्या समजुतीप्रमाणें हिंदु स्त्रियांचे कांहीं उपास लीलाबाई करूं पाहत होत्या. बुद्धिवादी माधवरावांनीं त्याला हरकत घेतली. पण लीलाबाईंनीं त्या उपासामधील आपल्या भावनाचा इतिहास सागितल्यावर भावनाप्रधान माधवरावांनीं पुन्हा त्याना अशी हरकत घेतली नाहीं. माधवरावांनीं एकदां बोलण्याच्या भरांत लीलाबाईंच्या रूपाचा अवहेलनात्मक उल्लेख केला. सुंदर बायको न मिळाल्याचा राग माधवरावांच्या मनांत डंख मारीत होता त्याचाच हा उपहासात्मक उद्रेक असावा! हें बोलणें लीलाबाईंच्या जिव्हारीं लागलें. त्यांनीं फणकारून उत्तर दिलें,--

"मी कुरूप आहें त्याची जाणीव मला चांगली आहे. तुमच्याशीं लग्न झाल्यापासून तर माझ्या कुरूपपणाची जाणीव मला वारंवार लोकहि देऊं लागले आहेत. देवानें माझें रूप असें केलें हा माझा गुन्हा नाहीं परंतु कुरूप माणसांना अंतःकरण असतें हे माणसानें अगदींच विसरूं नये. किंबहुना कुरूप माणसाचें अंतःकरण सुंदर माणसापेक्षांहि सुंदर असूं शकतें हे ध्यानांत ठेवा."

या फटकाऱ्याचा योग्य परिणाम झाला. माधवरावांनीं पुन्हा बायकोच्या रूपाबद्दल खंत केली नाहीं. 'तुमच्या नशिबीं नरकातच जाणें असेल, तर जा खुशाल नरकांत,' असेहि एकदां वैतागानें माधवरावाना बजावण्याची पाळी लीलाबाईवर आली होती, त्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. "मी तुमच्या-करतां इतकी जीव टाकते तरी तुम्हाला माझ्या तळमळीची जाणीव होत नाहीं," अशी तक्रार लीलाबाईंनीं एकदां केली आहे. लीला-माधव यांच्या संसारकथेचें एक सूत्र ध्यानीं घेण्यासारखें आहे. जेव्हां जेव्हां लीलाबाई स्पष्टपणें वेळच्या वेळीं बोलत, तेव्हां तेव्हां माधवरावांना आपली चूक तत्काळ कळून येई व ते ती निश्चयानें दुरुस्तहि करीत. अशाच एका प्रसंगासंबंधीं लीलाबाईंना माधवराव लिहितात,—

"...त्याच वेळीं तूं कांहीं बोलली असतीस तर मीं तेव्हांच तुझ्या मनां-तला गैरसमज लगेच दूर केला असता आणि तुला झालेला त्रास लगेच दूर झाला असता ...अशा रीतीनें मनात आलेले कांहीं विचार लपविणें आपल्या दोघांत आणि तेहि आपल्या दोघाविषयीं, इष्ट आहे का? मनमोकळेपणानें जो ज्ञानाधिष्ठित विश्वास जडेल, तो जपून बोलण्यानें जडेल का?...इतक्या वर्षांनंतर तूं अजूनहि मनाला गोष्टी लावून घेतेस! मोकळेपणानें तेव्हांच्या तेव्हां बोलून टाकीत नाहींस. काय म्हणावें तुला!"

यावरून हें स्पष्ट होतें कीं, माधवरावांच्या 'स्वप्नाळू मूर्खपणा'नें लीलाबाईंना जसा त्रास झाला, तसाच त्रास खुद्द लीलाबाईंच्या संकोची व निमूटपणें आज्ञापालन करणाऱ्या स्वभावानेहि झाला आहे.

अनुभव, अपत्यप्राप्ति आणि सहवासानें उत्पन्न होणारें प्रेम यांमुळें माधवरावांच्या स्वभावांत पुढे पुढें पालट होत गेला. 'वेताळ' नाहींसा झाला. लीलाबाईंना आपल्या 'स्वप्नाळू' कल्पनेप्रमाणे अमुक प्रकारची 'स्त्री करण्याचे' माधवरावाचे विचारहि सौम्य होत गेले. तडजोडीनें जीवन सुसह्य होतें हे त्यांना अनुभवाने पटूं लागलें व सर्वांत म्हणजे आपल्या मागें आपल्या बायकोचें व मुलाचें कांहीं बरेंवाईट न होऊं देण्याची जबाबदारी आपल्यावर आहे ही जाणीव माधवरावाना तीव्रतेने होऊं लागली. त्यांच्या सांसारिक वागणुकींतील एककल्लीपणा, हेकेखोरपणा, माणूसघाणेपणा मावळत चालला. काटकसरीनें वागून पैसा गाठीं ठेवावा, घर बांधावें, बायकामुलांसाठीं विमा उतरावा, वगैरे विचारांनीं माधवरावांच्या मनाची पकड घेतल्यानंतर मात्र ते लीलाबाईंशीं अधिक समजुतीनें, जास्त प्रेमानें आणि कमी हुकुमशाहीनें वागूं लागले. वैवाहिक ध्येयांचा चक्काचूर झाल्याचें दु:ख कमी होण्याचें कारण "अमुक असें झालें असतें तर बरें झालें असतें असें म्हणण्यांत आणि खेद करण्यांत काय तात्पर्य आहे, या विचाराकडे माधवरावाची प्रवृत्ति वळली; आहे या परिस्थितींत प्रेमपूर्वक कर्तव्य करणें हाच स्वधर्म होय" हें त्यांना पटलें होतें. शिवाय त्यांना असेंहि वाटूं लागलें होते कीं,—

"शेवटीं आपणच एकमेकांस आहोंत."

लग्न झाल्यानंतरहि "मी आतां एकटा नाहीं हें विसरतों ग," असें म्हणणाऱ्या माधवरावांच्या वृत्तींत "शेवटीं आपणच एकमेकांस आहोंत" असें वाटूं लागण्याइतका फरक घडून आला हा खरोखरी गृहिणी या नात्यानें लीलाबाईंचा मोठा विजय आहे !

'आमचीं अकरा वर्षें' या पुस्तकांत माधवरावांचा मानसिक व स्वाभाविक कायाकल्प कसा झाला याचें उद्बोधक चित्रण पाहावयास मिळतें. आतांपर्यंत या पुस्तकांत ज्या पतिपत्नींच्या सांसारिक जीवनाची चर्चा करण्यांत आली, त्यांत पतीनें पत्नीचा 'कायाकल्प' घडविला होता; पण लीला-माधव

या जोडप्याच्या बाबतींत प्रकार उलट झाला आहे. लग्नामुळें माधवराव 'माणसाळले.' "पूर्वी, म्हणजे १९२८ सालचे कठोर, एककल्ली, हट्टी माधवराव आतां संसारांतील सुखदु:खांची झळ लागून शांत व अत्यंत मृदु अंत:करणाचे झाले होते," असें लीलाबाई म्हणतात.

'आमचीं अकरा वर्षें' या पुस्तकांत माधवरावांच्या सांसारिक जीवना-व्यतिरिक्त इतरहि कांहीं भाग दिलेला आहे; पण माधवरावांच्या सार्वजनिक जीवनाशीं आपला फारसा संबंध आला नाहीं असें लीलाबाईंनींच कबूल केलें आहे, आणि माधवरावांच्या कांहीं कवितांच्या जन्मकथांशीं जरी लीलाबाईंचा थोडाफार संबंध असला, तरी कवितांत प्रकट झालेल्या विचारांची वास्तवाशीं गल्लत करणें योग्य होणार नाहीं. म्हणून पुस्तकांतील इतर प्रकरणांसंबंधीं या लेखांत चर्चा करणें अप्रस्तुत ठरेल. या ठिकाणीं बायकोच्या दृष्टिकोनांतून नवरा कसा दिसतो एवढेंच पाहावयाचें असल्यानें तेवढ्या मुद्द्यापुरतेंच मी माझें विवेचन मुद्दाम मर्यादित ठेवलेलें आहे. सुदैवानें 'आमचीं अकरा वर्षें' हें पुस्तक या मुद्द्याच्या विवेचनाला भरपूर अवसर देणारें असें आहे. आपल्या संसाराचें इतके सडेतोड चित्रण करणारी स्त्री खरोखरच विरळा आढळते व म्हणूनच श्री. लीलाबाईंचें प्रत्येक वाङ्मयप्रेमी व्यक्तीनें अभि-नंदन करणें अवश्य आहे. माधवराव पटवर्धन ही एक असामान्य व्यक्ति होती. त्याच्या स्वभावाचे पैलू यथार्थतेनें आकलन झाल्यावांचून त्याच्या वृत्तींचें, विचारांचें, वागणुकीचें व वाङ्मयाचेंहि नीट आकलन होणें शक्य नाहीं. माधवरावांच्या स्वभावाच्या सूक्ष्म छटा या पुस्तकांत श्री. लीलाबाईंनीं चांगल्या दाखवल्या आहेत. माधवरावांच्या लहरींना लीलाबाईंना बळी पडावें लागलें आहे, त्यांच्या विचारापुढें निमूटपणें मान वांकवावी लागली आहे. लीलाबाईंना झालेल्या त्रासाबद्दल वाचकाला सहानुभूति वाटते, पण याबद्दल माधवरावांना कितपत दोष द्यावा याबद्दल ठाम मत होणें कठीण आहे; कारण माधवरावांच्या संसारांत सुरुवातीस लीलाबाईंना जो त्रास झाला, तो त्यांनीं आपला 'नवरेपणा'चा हक्क गाजविण्यासाठीं दिलेला नसून त्यांच्या 'स्वप्नाळू मूर्खपणाचा,' त्यांच्या 'तत्त्वनिष्ठ वागण्याचा' तो अपरिहार्य परिपाक

होता. लीलाबाईंच्या व माधवरावांच्या स्वभावांत फारच अंतर होतें व त्यामुळेंहि अंशतः सांसारिक त्रास दोघांना सोसावा लागला. पण, माधवरावांना या प्रकारची जसजशी जाणीव होऊं लागली, तसतसा त्यांनीं आपल्या वागण्यांत निश्चयपूर्वक बदल केला व शेवटीं शेवटीं श्री. लीलाबाईंच्या समजुतीप्रमाणें त्यांना संसारांत वागण्याचे स्वातंत्र्य दिलें. हें स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच नवराबायकोंत परस्पर समजूत व सलोखा वाढला आणि संसारांत सुख व समाधान यांचा जन्म [illegible]ला !

## बोलक्या सांवल्या

" मी माझ्यासंबंधाने अशी फारशी हकीकत लिहूं नये म्हणून आरंभापासून हा विचार मनांत ठेवून चालले आहे; पण चमत्कार हा, कीं, संसारांत नायकीचा संबंध अगदीं सावलीसारखा असल्यामुळे न कितीहा टाळूं म्हटल तरी टाळतां येत नाहीं. म्हणून **स्वतः**ची गोष्ट अगर मनाची स्थिति नीट समजण्याकरितांच जेथें माझा संबंध आला आहे, तेथें मात्र चालतच नाहीं, म्हणून ठेवित आहे. "

—रमाबाई रानडे

आमच्या आयुष्यातील कांहीं आठवणी.

" **ना**यकांच्या दृष्टिकोनातून नवरे " या माझ्या अभिनव लेखमालेंत मीं आतांपर्यंत (१) रमा–माधव, (२) आनंदी–गोपाळ, (३) आनंदी–धोंडो, (४) लक्ष्मी–नारायण, (५) लीला–माधव, या पाच पतिपत्नींच्या सासारिक जीवनाची चर्चा केली. ही चर्चा करतांना, मुख्यतः पत्नीनें लिहिलेल्या

शब्दांवरच भर देऊन तिच्या लेखणींतून तिच्या नवऱ्याचें चित्र कसें शब्द-रूप घेतें एवढेंच दाखविण्याचा माझा हेतु होता. आपल्या नवऱ्याविषयीं चिकित्सक दृष्टीनें तर राहोच, पण भाविकपणानेंदेखील कांहीं लिहून छापण्यास तयार होणाऱ्या स्त्रिया आजहि महाराष्ट्रांत मोजक्याच आहेत. तेव्हां गेल्या चाळीसपन्नास वर्षांत अशा स्त्रियाची संख्या एका हाताच्या बोटांवर मोजण्यासहि अपुरी पडावी ही नवल करण्यासारखी गोष्ट नाहीं. तसें पाहिलें तर ललितवाङ्मय लिहिणाऱ्या किती तरी स्त्रिया आज महाराष्ट्रांत आहेत व त्यापैकीं काहीं स्त्रिया तर आपल्या वाङ्मयातील गुणसंपन्नतेपेक्षाहि त्यांतील केवळ पुरोगामीपणामुळेच अधिक प्रसिद्धि पावलेल्या आहेत. पण या स्त्रियाहि स्वतःच्या नवऱ्यासंबंधींच्या हकीगती सत्य व स्पष्ट सांगण्यास तयार नसतात ! अशा स्थितींत बायकांच्या दृष्टिकोनांतून नवरे कसे दिसतात, या विषयाचे आणखी नमुने दाखविणें शक्य नाहीं.

१९४७ सालीं मीं ऑल इंडिया रेडिओच्या मुंबई स्टेशनसाठीं रमाबाई रानडे आणि आनंदीबाई जोशी याच्या जीवनावर दोन ' रूपकें ' लिहून दिलीं होतीं. या रूपकांच्या लिखाणासाठीं मला रमाबाईंचें ' आमच्या आयुष्यातील कांहीं आठवणी ' हें पुस्तक आणि काशीबाई कानिटकरांनीं लिहिलेलें ' आनंदीबाई जोशी यांचे चरित्र ' हें पुस्तक वाचावें लागलें. हीं दोन्हीं पुस्तकें मीं लहानपणीं वाचलीं होतीं व त्याच्या चांगुलपणाचा ठसा माझ्या मनावर :कायम होता. तरी पण हीं पुस्तकें मीं पुन्हा वाचली, तेव्हां माझ्या मनांत या दोघाहि स्त्रियांनीं आपापल्या नवरदेवांच्या निर्मिलेल्या वाङ्मयमूर्तींची तुलना नकळतच आली. माधवराव रानडे आणि गोपाळराव जोशी यांच्यांत जसें साम्य थोडें व विरोधच जास्त होता, तसाच जवळजवळ प्रकार रमाबाई आणि आनंदीबाई यांचाहि आहे. या दोघींच्याहि नवऱ्यांनीं आपापल्या बायकांना ज्या प्रकारें वागविलें, त्यातहि कांहीं सारखेपणा नाहीं. आणि तरीहि या दोघी स्त्रिया आपापल्या नवऱ्याचें गुणसंकीर्तनच करतात, त्यांच्या दोषांचेंहि समर्थन करूं पाहतात, त्यांना परमेश्वररूप मानून त्यांच्या सेवेंत धन्यता मिरवतात ! हा प्रकार पाहूनच " बायकांच्या दृष्टिकोनातून

नवरे " कसे दिसतात हें आणखी थोडें खोल जाऊन पाहण्याची कल्पना मला स्फुरली व तिचेंच फळ म्हणजे प्रस्तुत पुस्तक होय.

या पुस्तकांत फक्त पांचच जोडप्यांचा समाचार घेण्याचें कारण यापेक्षां अधिकांचा परामर्श घेण्याला आवश्यक ती साधनसामुग्री उपलब्ध नाहीं हेंच आहे. एरवीं हा विषय सामाजिक दृष्टया अतिशय जिव्हाळ्याचा असल्यानें त्याची जास्त चर्चा होणें अगत्याचें आहे असें माझें स्पष्ट मत आहे. मीं फक्त या विषयाला तोंड फोडलें आहे, इतकेंच. या विषयाच्या अधिक आणि विविधांगी चर्चेला योग्य साधनसामुग्रीचा अभाव ही मोठीच अडचण आज आहे. रमाबाईनीं ' आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी ' हें पुस्तक लिहिल्याला आतां तब्बल तीन तपें उलटलीं आहेत. रमाबाईचें हें पुस्तक मराठी वाङ्मयाचें एक मोठें भूषण म्हणून इतकीं वर्षे गाजत आहे. तरीहि, या कालात लेखिकांचें पीक महाराष्ट्रांत उमाप येऊनहि, रमाबाईचें अनुकरण करण्याची बुद्धि एकंदरीनें विरळाच. प्रस्तुत पुस्तकात मीं ज्या जोडप्यांचा परामर्ष घेतला त्यांपैकींहि फक्त श्री. लीलाबाई पटवर्धन यांनींच काय तें आपल्या नवऱ्याचें स्वभावचित्र काढण्यासाठींच म्हणून पुस्तक लिहिलें. बाकीच्या स्त्रियांचें लिखाण या हेतूनें झालेलें नाहीं. इतर कांहीं कारणानें त्यांनीं लेखणी हातीं धरली व तींतून त्याच्या नवरोजींची वाङ्मय-मूर्ति–बहुधा त्यांनाहि नकळत–निर्माण झाली असा हा मामला आहे! नवऱ्याचें नांव घेण्याइतकेंच नवऱ्याच्या स्वभावाचें वर्णन लिहिणेंहि अजून स्त्रियांना इतकें ' लज्जास्पद ' वाटतें काय?

मीं चर्चिलेल्या पाच स्त्रियांव्यतिरिक्त आणखी स्त्रियांनीं आपले पतिविषयक विचार ग्रंथरूपाने प्रकट केल्याचें मला तरी फारसें आढळलें नाहीं. श्री. पार्वतीबाई आठवले आणि श्री. कमलाबाई देशपांडे याच्या अनुक्रमें " माझी कहाणी " व " स्मरणसांखळी " या आत्मवृत्तात्मक ग्रंथांत त्यांनीं आपापल्या पतीचें वर्णन उल्लेख करण्याइतकेंहि केलेलें नाहीं. पार्वतीबाई आठवले यांचें लग्न अकराव्या वर्षी झालें, तरी त्यांच्या प्रत्यक्ष संसाराला सुरुवात चौदाव्या वर्षी झाली व विसाव्या वर्षी त्यांच्यावर वैधव्याची आपत्ति

कोसळली. "माझी कहाणी" मध्यें आपल्या वैवाहिक जीवनाची हकी-कत त्यानीं अवघ्या दोन पृष्ठात संपवली आहे. आपल्या पतीचा उल्लेख त्यांनीं "आमचे पुरुष" असा केला आहे. त्यांच्या पतीमध्यें वर्णन करण्यासारखे गुणविशेष कांहींच नव्हते व त्यांच्या संसारांतही सांगण्या-सारखें कांहीं नसल्यानें पार्वतीबाईनीं हा विषय अगदीं थोडक्यात आटोपता घेतला आहे. कमलाबाईंच्या 'स्मरणसांखळी' या पुस्तकाचा हेतु आत्म-चरित्र–लेखनाचा नसून लेखिकेच्या शैक्षणिक जीवनवर्णनाचा असल्यानें त्या संदर्भांत कमलाबाईना आपल्या सांसारिक कथा सागण्यास किंवा पतिस्वभा-वाचें वर्णन करण्यास सवडच नव्हती. पुस्तकरूपानें नसले तरी स्फुट लेखांच्या स्वरूपात सौ. कमला फडके, सौ. शाता माडखोलकर व सौ. इंदु गाडगीळ यानीं अनुक्रमें प्रो. ना. सी. फडके, श्री. ग. त्र्यं. माडखोल-कर व श्री. पां. वा. गाडगीळ यांच्यासंबंधीं आपापले अभिप्राय प्रगट केले आहेत; पण त्या त्रुटित अभिप्रायावरून प्रस्तुत लेखमालेच्या प्रतिपादित विषयाला फारच थोडे साहाय्य होण्यासारखें आहे. वास्तविक पाहतां आपल्या संसाराचें खरेखुरें चित्रण करण्यास स्त्री मोठी 'लेखिका'च हवी असें मुळींच नाहीं. रमाबाई रानडे कुठें मोठया 'साहित्यिका' होत्या ? खरी अडचण आहे ती स्त्रियाच्या संकोची व लाजऱ्या स्वभावाची आहे; त्याच्या साहित्य-विषयक कौशल्याची नव्हे !

आणि माझें हें पुस्तक तुम्ही संपूर्ण व काळजीपूर्वक वाचलें असेल तर तुम्हालाहि हें कबूल करावे लागेल कीं, आमच्या स्त्रिया कितीहि शिकल्या-संवरल्या, त्याच्या भोवतालची समाजनीति व परिस्थिति कितीहि बदलली, तरी त्याच्या रक्तात जें 'आर्य स्त्रीत्व' आहे त्याचा पगडा त्यांच्या मनावरून फारसा ढिला झालेला नाहीं–होऊं शकतहि नाहीं ! ज्या पांच स्त्रियाच्या वाङ्मयात्मक पतिमूर्तींचें मीं तुम्हाला या पुस्तकात दर्शन घडविलें, त्यांपैकी रमाबाई रानडे व लक्ष्मीबाई टिळक याना शालेय शिक्षणाचा काडीमात्रहि संस्कार झालेला नव्हता. घराच्या चार भिंतींआडच त्यांचें सारें 'शिक्षण' झालें होतें. सौ. आनंदीबाई कर्वे याना शपथेपुरतें शालेय शिक्षण लाभलेलें

आहे व त्यांची सारी हयात कार्याच्या निमित्तानें शिक्षणक्षेत्रातच गेली आहे. श्री. लीलाबाई पटवर्धन पदवीधर स्त्री आहेत आणि आनंदीबाई जोशी या पाश्चात्य विद्याविभूषित होत्या. शैक्षणिक दृष्टीनें पाहिलें तर उपर्युक्त पांच स्त्रियांमध्यें सामान्य शिक्षणलाभ झालेल्या स्त्रीपासून उच्च शिक्षणांतहि पारंगतता मिळवलेल्या स्त्रीपर्यंतच्या स्त्रिया आहेत. शिवाय, या पाच स्त्रिया एकाच पिढीतील किंवा समकालीन नसून गेल्या सुमारें साठपाऊणशें वर्षांतील वेगवेगळ्या पिढींतील आहेत. असें असतांहि त्यांच्यामध्ये आपापल्या पतीबाबत वृत्ति, विचार व वागणूक यांचें बरेंचसें साम्य दिसून येते ही सहज लक्षांत येण्यासारखी गोष्ट आहे. रमाबाई रानडे ज्याप्रमाणें पन्नाससाठ वर्षांपूर्वी '**स्वतः**ला (न्या. रानडयांना ) आवडत असत, त्याच गोष्टी करण्याचा नियम ' पाळीत असलेल्या दिसतात, तद्वत् नव्या युगातील श्री. लीलाबाई पटवर्धनहि ' ज्याच्याशीं लग्न होईल त्याच्याशीं जुळते घेणें ' हेंच इतर हिंदु स्त्रियांप्रमाणें आपलेंहि ध्येय असल्याचें सागतात !

बायकोच्या रक्तांतील पतिव्रतेचा ' पिंड ' परिस्थितीनें किंवा शिक्षणानें बदललेला नसल्याचें मीं या पुस्तकात चर्चिलेल्या पांचहि स्त्रियांच्या पतिविषयक दृष्टिकोनावरून स्पष्ट होतें. या उलट नवऱ्याच्या आपल्या बायकोला वागवण्याच्या स्वाभाविक वृत्तींत ( पद्धतींत नव्हे ) कितीसा फरक झाला आहे ? रमाबाईपासून लीलाबाईपर्यंतच्या बायका या प्रश्नाचें काय उत्तर देतात तेंहि :मीं आतांपर्यंत विशद केलेंच आहे. ' आपल्या माणसानें ( म्हणजेच बायकोनें ) आपल्या ( म्हणजे नवऱ्याच्या ) मताप्रमाणें वागावें,' ही अपेक्षा पहिल्या माधवरावांच्या [ रानडे ] मनांत होती, तशीच ती दुसऱ्याहि माधवरावांच्या [ पटवर्धन ] मनांत वागत होती. या मूळ अपेक्षेंत फरक नव्हता; तफावत आहे ती, ती अपेक्षा कृतींत उतरवण्याच्या पद्धतींत आहे !

या पुस्तकांत ज्यांच्या संसाराची चिकित्सा करण्यांत आली, त्यांपकीं एक गोपाळराव जोशी सोडले, तर बाकीचे चौघेहि पुरुष आपा-

पल्या सामाजिक, साहित्यिक, राष्ट्रीय स्वरूपाच्या सार्वजनिक कार्यामुळें महाराष्ट्रांत महत्त्व व मान मिळविलेले असे आहेत. पण त्यांच्या बायकानीं त्यांच्याकडे निव्वळ सांसारिक दृष्टीनेंच मुख्यतः पाहून आपापले ग्रंथ लिहिले आहेत. पतीच्या सार्वजनिक किंवा घराबाहेरील कार्याचा उल्लेख एकादीनें केलेला असला, तरी तो अगदीं औपचारिक स्वरूपाचा व इतर कोठल्या तरी कारणाच्या अनुषंगानें केलेला आहे. या बाबतींत फरक इतकाच दिसून येतो कीं, अडतीस वर्षांपूर्वी रमाबाईनीं आपल्या पुस्तकांत पतीच्या सार्वजनिक कार्याचा उडता उल्लेखहि फारसा येऊं दिलेला नाहीं, तेथे लीलाबाईनीं त्या दृष्टीनें थोडी जास्त प्रगति दाखवलेली आहे. पण मुख्य दृष्टि पतीच्या सार्वजनिक कार्यावर नसून त्याच्या घरगुती वागण्यावरच केंद्रित असल्यानें सर्वच स्त्रियांनीं आपल्या पतीकडे निव्वळ संसारी दृष्टीनेच पाहिलेलें आहे.

पहिल्याच लेखांत मीं म्हटलें आहे कीं,—

> " थोर पुरुषाची पत्नी कांहींही न करतां समाजांत मान्यता मिळवूं शकते हे खरें आहे; पण संसारांत ती इतर चारचौघींप्रमाणे सुखी व समाधानी असते का? ज्याला सारा समाज थोर पुरुष म्हणून डोक्यावर घेऊन नाचतो त्या तिच्या नवऱ्याविषयीं खुद्द तिला काय वाटतं याचा कधीं कुणी कानोसा घेतला आहे काय? थोर पुरुषांच्या पदरीं पडल्यामुळेंच अनेक स्त्रियांना स्वतःचं मन मारून जीवन जगावें लागतं. अर्थातच आपल्या स्त्रियांच्या अंगीं असलेलें 'आर्य' रक्त त्यांच्या तोंडून या प्रकाराविरुद्ध ब्रहि काढूं देत नाहीं. पण समजा कीं, सर्व थोर पुरुषांच्या बायकांनीं आपापल्या 'थोर' नवऱ्यांच्या सहवासांत आपल्या वांट्यास आलेल्या सुखदुःखांचा भोगवटा स्पष्टपणें व मोकळेपणें सांगून टाकण्याचं मनांत आणलं, तर अनेक थोर पुरुषांच्या 'मोठेपणां'त कांहीं टक्के तरी कपात करूनच त्यांचा मोठेपणा मोजीत बसण्याची पाळी समाजावर खास येईल!"

माझा हा सिद्धांत शंभर टक्के सत्य असल्याचें मी आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून तुम्हालाहि पटलें असेल अशी मला आशा आहे. शितावरून

भाताची परीक्षा या न्यायानें हे पांच लेखांक उपर्युक्त सिद्धांताची सत्यता पटविण्यास पुरे आहेत असें मला वाटतें. शिवाय मीं जी पाच जोडपी निवडलीं तीं आपल्या वैशिष्ट्यपूर्णतेमुळें अनेक संसारांचे प्रतिनिधित्व मिरविण्यास पूर्णपणें लायक असल्यामुळें या पांच नमुन्यांवरून काढलेला सिद्धात आणखी मासल्याच्या अभावीं चुकीचा मानण्याचेहि कारण नाहीं.

" संसारांत बायकोचा संबंध अगदीं सावलीसारखा असतो " असे रमाबाईनीं आपल्या पुस्तकांत म्हटले आहे व नंतरच्या सर्व स्त्रियानीं ते सत्य आपल्या आचरणानें सिद्ध केलें आहे. माणसाची सावली ही गोष्ट अशी आहे कीं ती नेहमी जरी त्याच्या पायाशीं घोटाळत असते तरी ती माणसाचे चित्र भूमीवर उठविते ते काळेच असते ! नवऱ्याच्या सावलीसारखी असणारी त्याची बायकोहि संसारात हेच काम करीत असते ! आणि प्रस्तुत पुस्तकांतहि मीं हे दाखवून दिलें आहे की, थोर पुरुषाच्या स्वभावाची 'काळी' बाजू त्यांच्या 'सावली' रूप बायकानी कळतनकळत आपल्या ग्रंथात उजळून दाखविली आहे ! ही 'काळी' बाजू आणखी स्पष्ट करण्याचें या बायकाना जमलें नाही याचे एक कारण त्यांच्या रक्तातील 'आर्य स्त्रीत्व' हें तर मीं सागितलेंच, पण त्याचबरोबर आणखी एक कारण सागितलें पाहिजे. ते म्हणजे या बायकाच्या ठिकाणीं असणारा अस्मितेचा अभाव हें होय. आनंदीबाई जोशी व सौ. आनंदीबाई कर्वे या दोनच स्त्रियानीं आपल्या लेखनात हा अस्मितेचा आविष्कार काहीं प्रमाणात केलेला आहे व तेवढ्यापुरते त्याचे लिखाण सडेतोड झालेलेहि आहे. बाकीच्या स्त्रियानी या गुणाच्या अभावीं आपापल्या पतीची स्मृतिपूजाच अधिक बाधलेली आहे. 'हिंदु स्त्री कितीहि कर्तृत्वशाली व सुधारणावादी झाली, तरी ती स्वतःला आपल्या नवऱ्यापेक्षां कमी योग्यतेचीच अखेर समजते' हे याचे खरे कारण आहे.

रानडे, जोशी, कर्वे, टिळक व पटवर्धन या पाचहि पुरुषात लग्नापूर्वी बायकोविषयीं मनांत निश्चित स्वरूपाच्या अपेक्षा फक्त एकट्या माधवराव पटवर्धनांच्या मनांतच काय त्या होत्या. बाकीच्या पुरुषांची वृत्ति 'पदरीं

पडलें नि पवित्र झालें ' अशीच होती. कर्वे यांना समाजसुधारणेच्या दृष्टीनें पुनर्विवाह करावयाचा होता आणि गोपाळराव जोश्यांना स्वतःच्या इच्छेला येईल तेवढें शिक्षण आपल्या बायकोला द्यावयाची मनीषा होती. पण या कांहीं पत्नीविषयक अपेक्षा म्हणतां येणार नाहींत. माधवराव रानड्यांनाहि पुनर्विवाह करण्याची इच्छा होती, पण ती त्यांच्या वडील मंडळींनीं पुरी होऊं दिली नाही. रमाबाईशीं माधवरावांचें लग्न झालें ही गोष्ट माधवरावांच्या सार्वजनिक सुधारणावादी प्रतिष्ठेला बाधकच झाली व तेवढ्यापुरता हा विवाह हा रानड्यांच्या ' विवाहविषयक स्वप्नांचा चक्काचूर ' म्हणता येईल. पण रानड्यांनीं हें दुःख मनांत उगाळीत न बसतां नव्या बायकोला आपल्या मनाप्रमाणें ' तयार ' करण्यास आरंभ केला. माधवराव रानड्यांनीं या बाबतींत अगदीं सुरुवातीपासूनच परिस्थितीशीं जुळतें घेण्याचा जो समजूतदारपणा दाखवला, तो माधवराव पटवर्धन यांना संसाराच्या सुरुवातीस दाखवतां आला नाहीं. म्हणून रमा–माधवासारखा लीला–माधव हा संसार सुखाचा व समाधानाचा झाला नाहीं. पटवर्धनांच्या संसाराची सुरुवात पतिपत्नींचीं मनें एकमेकांविषयीं साशंक असलेल्या परिस्थितींत झाली व ती परिस्थिति बराच काळ टिकली. तसा प्रकार इतर कुणाच्या संसाराचा झालेला नसल्यानें पटवर्धनांच्या संसारांत विरोधी मनोधर्मांचा जो सूक्ष्म झगडा पाहावयास मिळतो, तसा इतरांच्या संसारांत पाहावयास मिळत नाहीं. गोपाळराव आणि आनंदीबाई जोशी यांच्या संसारांत जो झगडा दिसतो तो याहून निराळ्या प्रकारचा आहे. एक महान् योग्यतेची स्त्री व तिचा क्षुद्रप्रकृति नवरा यांच्यांतील तो विजोड संसाराचा झगडा आहे.

वयाच्या दृष्टीनें पाहतां माधवराव आणि रमाबाई यांच्यांत एकवीस वर्षांचें अंतर होतें. गोपाळरावांच्या वयाचा निर्देश आनंदीबाईंच्या चरित्रांत मिळत नसल्यानें या पतिपत्नींच्या वयांत किती अंतर होतें तें निश्चित कळत नाहीं. पण विवाहसमयीं गोपाळराव बिजवर होते व आनंदीबाई अवघ्या नवांच्या होत्या. गोपाळरावांचें वय त्या मानानें बरेंच असावें असा तर्क एकंदर चरित्रवाचनानें होतो. आनंदीबाई व धोंडोपंत यांच्या वयांत सात वर्षांचें अंतर आहे. लक्ष्मीबाई व टिळक यांच्यांत हें अंतर तितकेंच

होतें. लीलाबाई व पटवर्धन यांच्यांत दहा वर्षांचें अंतर होतें. पण वयांतील कमीअधिक अंतरापेक्षांहि मनोवृत्तींतील कमीअधिक अंतरानेंच संसार सुखाचा किंवा दुःखाचा होण्याला अधिक मदत होते. लील–माधव यांच्या वयांतील अंतर रमा–माधव यांच्या वयांतील अंतरापेक्षां निम्म्याहून कमी आहे, पण मनोवृत्तींतील अंतरामुळेंच त्यांचे–त्याचे संसार वेगवेगळ्या वळणावर गेले. आनंदीबाई व धोंडोपंत आणि लक्ष्मीबाई व टिळक यांच्या वयांत अंतर सारखेंच आहे, पण त्यांच्याही सांसारिक सुखामध्यें विभिन्नता दिसते ती त्या त्या जोडप्याच्या स्वभावगुणावर आधारलेली आहे.

रानडे व जोशी या दोघांनींहि रमाबाई व आनंदीबाई यांस शिक्षण देऊन सामाजिक प्रतिष्ठा मिळवून देण्याचे काम केलें. त्यामुळे या दोघींनीं आपापल्या नवऱ्याला गुरु किंवा मार्गदर्शक मानावे हे साहजिक आहे. कर्वे यांचा मोठेपणा मान्य करूनहि त्यांच्यापासून आपणास स्फूर्ति लाभलेली नाहीं हे स्पष्ट सांगण्याइतकी अस्मितेची जाणीव सौ. आनंदीबाईंच्या ‘ माझें पुराण ’मध्यें आहे. रे. टिळकानी लक्ष्मीबाईंना ‘ कोणी तरी मोठें ’ होण्याला स्वतः प्रत्यक्ष अशी कसलीहि मदत केलेली नाहीं, तरीहि लक्ष्मीबाई त्यांना आपला ‘ सूत्रधार ’ म्हणतात. लक्ष्मीबाईंना टिळकानीं स्वतः शिकविलें नाहीं किंवा शाळेंत घालूनहि त्यांचे शिक्षण करून घेतले नाहीं. लक्ष्मीबाईंचें लग्न होण्यापूर्वीच गोपाळराव जोश्यानी आपल्या बायकोला शाळेंत पाठविलें होते व त्यापायीं होणारा त्रास सोसलाहि होता. पण तेवढी ध्येयनिष्ठा रे. टिळकांच्या ठिकाणीं नव्हती. पटवर्धन–दांपत्याबाबत परिस्थितीनेंच हा प्रश्न सोडवून टाकलेला होता.

पत्नीचें काम पतीच्या हरेक कृतीला व उक्तीला ‘ मम ’ म्हणण्याचें आहे या भावनेनें रमाबाई वागल्या; लक्ष्मीबाईनींहि, एकीकडे पतीशीं पोटभर भांडत असतां, तोच मार्ग अनुसरला. लीलाबाईनीं अधिक सुसंस्कृतपणें पण तेंच केलें. आनंदीबाई जोश्यांनीं मात्र कित्येक बाबतींत गोपाळरावांना ‘ मार्गा ’ला लावण्याचें काम आपल्या बुद्धिमत्तेच्या व व्यक्तिमत्वाच्या जोरावर केलेलें दिसतें. अमेरिकेंत स्थायिक होण्याचा

— ब्याऐंशीं —

गोपाळरावांचा विचार आनंदीबाईनींच फिरवला व हिंदुस्थानांत जाऊन आपल्या देशबांधवांची सेवा करणें आपलें कर्तव्य असल्याचें त्यांनींच गोपाळरावांच्या मनांत मोठ्या चतुराईनें भरवलें. सौ. आनंदीबाई कर्वे यांनीं समाजसुधारणेच्या मार्गावर स्वतः प्रथम स्वतंत्रपणें पाऊल टाकलें व लग्नानंतर धोंडोपंतांचें सर्वच बाबतींत खरेंखुरें सहधर्मचारित्व केलें.

पतीच्या व्यक्तित्वांत विलीन होण्याच्या स्त्रीस्वभावामुळें बायकांना स्वतःच्या आवडीनिवडी, हौसी टाकून द्याव्या लागल्या आहेत हें प्रत्येक स्त्रीच्या पुस्तकांत दिसून आलेलें आहे, पण पत्नीसाठीं पतीनें आपल्या आवडीनिवडी अशा प्रकारें जाणीवेनें टाकल्याचें उदाहरण नाहीं. माधवराव पटवर्धनांच्या विवाहपूर्व दृष्टिकोनांत व वागण्यांत विवाहोत्तर बदल झाला आहे हें मीं दाखवून दिलेंच आहे पण हा बदल माधवरावांमध्येंच अनुभवाने व परिस्थितीनें झालेल्या वैचारिक क्रांतींतून जन्मला आहे लीलाबाईनीं जशा आपल्या आवडीनिवडी माधवरावांच्या लहरीसाठीं बाजूला सारल्या, तसल्या प्रकारचा हा बदल नव्हे; हा महत्त्वाचा फरक विसरतां कामा नये. लक्ष्मीबाईंना तर नवऱ्यासाठीं आपल्या आवडीनिवडीच काय, पण आपला धर्महि टाकावा लागला आहे. संसारांत सर्व प्रकारचा त्याग स्त्रीलाच करावा लागतो आणि तोहि पतीच्या मुर्वतीसाठीं; ही परिस्थिति फारशी बदललेली नाहीं, हेच या पांचहि संसारांपासून आपणांस दिसून येतें.

प्रस्तुत पुस्तक प्रकाशनाच्या सीमेवर असतांना ग्वाल्हेरच्या श्री. इंदिराबाई भागवत यानीं आपले पति कै. वाय्. सदाशिव यांचें लिहून प्रसिद्ध केलेलें 'या, सदाशिव' हें चरित्रात्मक पुस्तक माझ्या वाचनांत आलें. या पुस्तकांत पत्नीनें पतीचें चरित्र लिहिलेलें आहे तें मुख्यतः लौकिक स्वरूपाचें आहे; कौटुंबिक स्वरूपाचें नव्हे. या सुमारें दीडशें पृष्ठांच्या चरित्रांत वाय्. सदाशिव यांच्या कौटुंबिक जीवनाचें वर्णन बरेंचसें शोधूनच काढावें लागतें. वाय्. सदाशिव हे चित्रप्रदर्शन व्यवसायांतील एक धाडसी व यशस्वी तरुण होते व त्यांच्या व्यवसायाचा व्याप सारखा वाढत होता. त्यामुळें त्यांचें राहणें वर्षांतून बरेच दिवस बाहेरगांवीं होई आणि ते ग्वाल्हेरीस असतांनाहि त्यांचा दिवसाचा बहुतेक वेळ आपला व्यवसाय व

मित्रमंडळी यांतच जाई, असें त्यांच्या या चरित्रावरून दिसतें. अर्थात्
' या, सदाशिव ' या पुस्तकात इंदिराबाईंना आपल्या पतीच्या कौटुंबिक
जीवनासंबंधी कांहीं विशेष लिहितां आलें नाहीं, यांत नवल नाहीं.
पतिपत्नीचा संसार चारचौघांसारखा सुरू होता, इतकेंच. पण इंदिराबाईंच्या
या पुस्तकाचा एक विशेष उल्लेखनीय आहे. या पुस्तकांत त्यांनीं आपल्या
नवऱ्याचें व्यावसायिक जीवन आणि कलाक्षेत्रांतील कार्य यांचें सविस्तर
वर्णन केलें आहे. पतीकडे केवळ संसारी पुरुष म्हणून नव्हे, तर एक
यशस्वी व्यावसायिक या दृष्टीनें पाहून त्याचे लौकिक जीवनचरित्र पत्नीनें
लिहिल्याचें मराठी वाङ्मयातील हें पहिलेंच उदाहरण आहे. प्रस्तुत
पुस्तकाच्या कक्षेंत जरी या प्रकारच्या पुस्तकाची चर्चा बसत नसली, तरी
पतीच्या कार्याकडे पाहण्याचा आधुनिक काळांतील पत्नीचा दृष्टीकोन कसा
व्यापक होत चालला आहे याचा नमुना म्हणून " या, सदाशिव " या
पुस्तकाचा उल्लेख जातां जातां करणें चूक ठरणार नाहीं.

---

## संदर्भग्रंथ

१ **आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी**—लेखिका-श्रीमती रमाबाई रानडे; प्रकाशक, सेवासदन सोसायटी, सदाशिव पेठ, पुणें नं. २; प्रकाशन काल एप्रिल १९१०.

२ **प. वा. सौ. डॉ. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र व पत्रें**—लेखिका-सौ. काशीबाई कानिटकर; प्रकाशक मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव, मुंबई नं. ४, प्रकाशन काल सप्टेंबर १९१२.

३ **माझें पुराण**—लेखिका-सौ. आनंदीबाई कर्वे; प्र.-के. भि. ढवळे, श्री समर्थ सदन, गिरगांव, मुंबई नं. ४; प्रकाशन काल एप्रिल १९४४.

४ **स्मृतिचित्रें**—भाग एक ते चार-लेखिका-श्रीमती लक्ष्मीबाई टिळक; प्र.-प्र. श्री. कोल्हटकर, गिरगांव, मुंबई नं. ४; प्रकाशन काल डिसेंबर १९३४ ते डिसेंबर १९३६.

५ **आमचीं अकरा वर्षें**—लेखिका- श्रीमति लीलाबाई पटवर्धन, जी. ए.; प्र. य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें नं. २; प्रकाशन काळ नोव्हेंबर १९४५

— चौन्बायेंशी —